**थोबाल** (श.) हिं. बं. इ. पूर्वेस मणिपूर सं. मणिपूरपा. १३ मैल.

**थोर्ला** (श.) हिं. बं. इ. टिपरा प्रां. टिपरापा. १८ मैल.

**थौट** (श.) हिं. राजपु. जोधपूर सं. नसिराबादपा. ४१ मैल.

**थौरी** (गां.) हिं. अयोध्या प्रां. गोमतीचे कांठीं.

**थंगलिंग** (पर्व.) हिं. काश्मिर सं. उत्तरेस.

**थांगडू** (श.) हिं. पू. ब्रह्मदे. आराकान प्रां.

**थांबा** (श.) हिं. वाय. प्रां. अलाहाबाद जि. अलाहाबादपा. २९ मैल.

**थुंडीभवानी** (देऊळ) हिं. हिमालयाचे सरभुरशिखरावर देवीचें स्थान.

**थौंगऐनमैंईट** (न.) हिं. ब्रह्म दे. सयाम दे.

**ध्यानशान** (पर्व.) आशि. खं पूर्वतार्तरी व रशियनतार्तरीमध्यें.

**ध्युलीयन** (पर्व.) यू. खं. नार्वेत.

**ध्येटिवो** (श.) हिं. ब्रह्म दे. इरावती नदीवर. येथें लष्करची छावणी. [देवळें.

**भ्रिपागोडास** (गां.) हिं. ब्रह्म दे. तेनासरीम पर. फार मोठीं तीन

## द.

**दचपुली** (श.) हिं. म. इ. गंतुर प्रां.

**दड्डी** (गां.) हिं. मुं. इ. बेळगांव जि. चिकोडी ता.

**दतवाड** (गां.) हिं. मुं. इ. कोल्हापूर सं. शिराळे पेट्यांत.

**दतीया** (सं.) हिं. वाय. प्रां. झांशीच्या वायव्येस.

**दतु** (भू.) आशि. खं. दक्षि. बोर्निओ बे. पश्चिमेस.

**द-दोआब** (मध्यप्र.) हिं. म इ. कृष्णा व तुंगभद्रा ह्या नद्यांमधील.

**दनेनहेद** (भू.) यू. खं. स्कातलंद दे. उत्तरटोंक.

दफळापूर (श.) हि. मुं. इ. द. महाराष्ट्रांत जत सं.
दब्लीन (श.) यू. खं. अयर्लंद दे. लिफी नदीचे कांठीं.
दमण (श.) हि. मुं. इ. उत्तर कोंकणांत पोर्तुगीज लोकांचें सं. येथे सेंट हिरोनिमस या नांवाचे देऊळ आहे.
दमणगंगा (न.) हि. मुं. इ. सह्याद्रींतून निघून अरबी समुद्रास मिळते. [मिळते.
दमन (न.) हिं. मुं. इ. सह्याद्रींतून निघून अरबी समुद्रास
दमार (गां.कि.) आशि. खं. अरबस्तान दे. येमेन प्रां.
दमास्कस (श.) आशि. खं. तुर्कस्तान दे. सिरिया प्रांतांत जार्दन नदीचे कांठीं. येथे योहान्नाची कबर.
दमोह (श.प्रां.) हि. मध्य प्रां. विंध्याद्रीच्या उतरणीवर जि. व ता.
दर (न.) हिं. आफ्रि. खं. नैल नदीला मिळते.
दरमुदर (श.) हिं. नेपाळ दे. खटमांडूपा० १९ मैल.
दरापुरा (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. गायकवाडचे रा.
दराया (श.) आशि. खं. आरबस्तान दे. मध्यभागीं नज्द प्रां.
दरिकी (श.) हि. बं. इ. कटक प्रां. कटकपा. ३६ मैल.
दरियाद (श.प्रां.) हिं. वाय. प्रा. अयोध्या जि.
दरूर (गा.) हि. मु. इ. बेळगाव जि. अथणी ता.
दरेशी (श.) हिं. म. इ. नेलोर प्रां. अनगोलपा. १० मैल.
दर्ग (सरो.) यू. खं.अयर्लंद दे.
दर्जी (श.) हिं. हिमालयाचे पायथ्याजवळ भुतान दे.
दर्यापुर (श.) हिं. वऱ्हाडांत एलिचपूर जि. तालुक्याचे ठिकाण.
दर्बीशायर (श.) यू. खं. इंग्लंदांत. येथें कोसंड सांपडते.
दर्वेतवातर (सरो.) यू. खं. इंग्लंदांत.

**दर्शनगंज** (श.) हिं. वाय. प्रां. पंचमिरट पर. घोघरा नदीचे कांठीं फैजाबाद पा. ५ मैल.

**दर्हम** (श. प्रां.) यू. खं. इंग्लंद दे.

**दल** (सरो.) हि. उत्तर काश्मिरांत.

**दवलघाट** (श.) हि. म. इ. निजामचे राज्यांत.

**दशार्णव** (क्षे.) हि. मुं. इ. काटेवाडांत.

**दशाबाईची टेंकडी** (टेंक.गां.) हि. मु. इ. नगर जि. पारनेर ता. पारनेरपा. ३ मैल.

**दश्नु** (श.) हिं. वाय. प्रां. दिल्लीपा० १८ मैल. मिरन पर.

**दसक्रोई** (गां.) हि. मुं. इ. गुजराथेंत अमदाबाद जि. तालुक्याचें गांव पण ठाणे अमदाबाद शहरीं.

**दस्तगीर** (गां.) हि. वऱ्हाडांत उमरावती जि.

**दसनुगड** (श.) हि. बं. इ. सिल्हट प्रां. सिल्हटपा. ३६ मैल.

**दहिवडी** (गां.) हि. मुं. इ. सातार जि. माण ता.

**दहिवद** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. अमळनेर ता

**दहिवली** (गां.) हि. मुं. इ. ठाणे जि. कर्जत ता. उल्हास नदीचे कांठीं.

**दहिवेल** (गां) हि. मुं. इ. खानदेश जि. पिंपळनेर ता.

**दहिसर** (गां.) हि. मुं. इ. ठाणे जि. कल्याण ता.

**दहिगांव** (गां.) हिं. मुं. इ. सोलापुर जि. माळशिरस ता.

**दक्षिण** (प्रां.) हिं. विंध्याद्रि पर्वताचे दक्षिणेकडील प्रदेशाचें नांव.

**दक्षिणअर्काट** (प्रां.) हि. म. इ. कर्नाटक परगण्याचा भाग, त्यास कदलोर म्हणतात.

**दक्षिणकानडा** (प्रां.) हि. म. इ. मलबार किनाऱ्यावरचा प्रांत.

**दक्षिणकेप** (भू.) आशि खं. चिनच्या पूर्वेस फोर्मोसा बेटाचे दक्षिणेस.

**दक्षिणकोंकण**(प्रां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जिल्ह्यांतील प्रदेशाचें नांव.

**दक्षिणपन्नार** (न.) हिं. म. इ. म्हैसूर सं. नंदीदुर्गाच्या डोंगरापा. नि. पोंदेशरी ज. बंगालच्या समु. मिळते. कांठीं पोर्त सेंत देवीड.

**दक्षिणमहाराष्ट्र**(प्रां.)हिं. मुं. इ. ह्या प्रांतांत बेळगांव, धारवाड कलादगी व कारवार हे जिल्हे आहेत व यांत कानडी भाषा चालते.

**दक्षिणमहासागर**(समु.) आशि. खं. द. दक्षिणध्रुवासभोंवतीं.

**दमांड** (न.) हिं. मुं. इ. सातारा जि. कृष्णेस मिळते.

**दाऊतपूर** (गां.) हिं. अयोध्या प्रां. लखनौ व सुलतानपूर ह्यांचेमध्यें.

**दाऊदनगर** (श.) हिं. बं. इ. बहार प्रां. व्यापाराचें ठिकाण. [मैल.

**दाऊदपूर** (श.) हिं. बं. इ. वीरभुम प्रां. मुरशीदाबाद पा. २०

**दागो** (बे.) यु. खं. बाल्तिक समु. [२० मैल.

**दाजा** (गां.) हिं. वाय. प्रां. अलाहाबाद पर. अलाहाबादपा.

**दाजीपूर** (गां.) हिं. मुं. इ. कोल्हापूर सं. भुदरगड पेट्यांत.

**दातीवरें** (गां.) हिं. मुं. इ. ठाणे जि. माहिम ता. व याच गांवाची खाडी.

**दात्या** (श.) हि. मध्यप्रां. बुंदेल खं. येथें दिवे व किल्लीनें उघडतांना दोन वेळां अवाज होणारीं कुलुपें तयार होतात.

**दादर** (श.) आशि. खं. बलुचिस्थानांत शहर २ मुंबईजवळ रेल्वेस्टेशन.

**दान उर्फ दोन** (न.) यू. खं. रशियांत यूनोफ सरो० निघून अझोप समु. मिळते. ११०० मै. लां.

**दान्युब** (न.) यू. खं. जर्मनींतून वादन प्रां. निघून काळ्या समु० मिळते. १६३० मै. लांब.

**दापुर** (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. सिन्नर ता.

**दापुरी** (गां.) हिं. मुं. इ. पुणे जि. पुण्यापा. ४ मैल येथें मुंबईचे गवरनर साहेबांचा रहाण्याचा बंगला आहे.

**दापोडी** (गां.) हिं. मुं. इ. पुणें जि. हवेली ता. पवना व मुळा ह्यांचे संगमावर येथें दु. बाजीरावाची इंग्लिशांबरोबर इ. १८१७ त लढाई झाली. [होती.

**दापोली** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. तालुका येथें छावणी

**दाभट** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. दापोली ता.

**दाभाडी** (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. मालेगांव ता. गिरणेच्या कांठीं येथें गूळ, कमोद पु. होतो.

**दाभील** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. दापोली ता.

**दाभोळ** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी. जि. दापोली ता. येथें मशीद पाहण्यासारखी आहे व लुगडीं तयार हो.

**दामणगंगा** (न.) हिं. मुं. इ. नाशिक जि. पेठ ता. तून ठाणें व सुरत ह्यांचे हद्दींतून जाऊन अरबी स. मिळते.

**दामणगांव** (गां.) हिं. वऱ्हाडांत उमरावती जि. उमरावतीपा. २९ मैल.

**दामियता** (श.) आफ्रि. खं. इजीप्त दे. नैल नदीचे मुखाजवळ.

**दामुक** (श.) हिं. वऱ्हाडांत उमरावती जि. उमरा. पा.२५मैल.

दामुदा (न.) हिं. बं० इ. छोटा नागपूर मां. निघून हुग- ळीस मिळते.

दामोदर (न.) हिं. बं० इ. रामगडच्या डोंगरांतून निघून हुगळीजवळ बंगालच्या उपसागरास मिळते काांठीं बरद्वान.

दायरबकर (मां.) आशि. खं. तुर्कस्तान देशांत कुर्दिस्तानांत.

दारणा (न.) हिं. मुं. इ. इगतपुरी ता. निघून गोदावरीस मिळते.

दारव्हा (गां.) हिं. वऱ्हाड मां. वणी जि. तालुका आहे.

दारागंज (श.) हिं. वाय. प्रां. अलाहाबाद जि. गंगेच्या कांठीं.

दारानगर (श.) हिं. वाय. मां. अयोध्या पर.

दारापुर (श.) हिं. पं. इ. झेलमच्या कांठीं. [च्या कांठीं.

दारापुराम (श.) हिं. म. इ. कोइमतूर मां. अमरावती नदी-

दारियन (अखा.) अमे. खं. कोलंबिया दे.

दार्जिलिंग (श.) हिं. हिमालयाचे पायथ्याशीं सिकीमच्या द. येथील हवा उत्तम आहे. बं. इ. जि.

दार्दानेल्स (सामु.) यू. खं. तुर्कस्तान दे.

दार्दोन (न.) यू. खं. फ्रान्सांत बिस्केच्या उपसा. मिळते.

दार्चंग (न.) हिं. पं. इ. सतलज नदीला मिळते.

दार्लिंग (न.) यू. खं. आस्ट्रेलियांत असून मरे नदीला मिळते.

दाल (न.) यू. खं. स्विदनांतून बाल्तिक समु. मिळते.

दालफिन्सनोज(भू.) हिं. म. इ. विजागापट्टणाजवळ.

दालमेशिया (मां.) यू. खं. आस्ट्रिया दे.

दालंग (श.) हिं. बं. इ. अमहर्स्ट मां. मोलमेनपा. १८मैल.

दावगुद् (श.) हिं. म. इ. नेल्लोर मां. अनगुळपा. १२ मैल.

**दावडी निंबगांव**(गां.) हिं. मुं. इ. पुणे जि.

**दावणपूर**(ध. प्रां.) हिं. वाय. प्रां. दिल्लीचे उत्तरेस कुंजपुरचे जहागिरीपैकी.

**दावदनागुती** (ग्रा.) हिं. म. इ. मदुरा प्रां. मदुरापा. २१ मैल.

**दावनकोंडा** (ग्रा.) हिं. म. इ. बल्लारी प्रां. [मैल.

**दावीपूर** (ग्रा.) हिं. वाय. प्रां. मुरादाबाद प्रां. मुरादाबादपा. १२

**दावेरकोंड** (ग्रा.) हिं. म. इ. निजामचें रा.

**दावेरहुल्ली** (ग्रा.) हिं. म. इ. म्हैसूर सं. [मैल.

**दामपुरी** (ग्रा.) हिं. वाय. प्रां. मिदनापूर पर. मिदनापूर पा. ३१

**दासोरी** (ग्रा.) हिं. राजपु. जोधपूर सं

**दाहोद** (ग्रा.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. खेडा जि. तालुका.

**दाहोमी** (प्रां.) आफ्रि. खं. कांगोमध्यें.

**दिदोंग** (न.) हिं. ब्रह्मदे. अमामोतून नि. ब्रह्मपुत्रेस मिळते.

**दिनवली** (गा.) हिं. मुं. इ. ठाणे जि.

**दिनन्ही** (ग्रा.) हिं. बं. इ. शहाबाद प्रां.

**दिनाघपूर** (ग्रा.) हिं. बं इ. पाटणा प्रा. गंगेच्या कांठी. पाटणापा. १० मैल. येथें लष्करची छावणी.

**दिनानुगर** (ग्रा.) हिं. प इ. लाहोर प्रा.

**दिनापूर** (ग्रा.) हिं. ब इ. बहार प्रा. येथें लष्करची छावणी आहे. येथें नकशीकाम उत्तम होते. [पूर्वेस.

**दिनारीक अल्प्स**(पर्व.) यु. खं. ऑस्ट्रियन डाल्मेशिया प्रांताचे

**दिपला** (ग्रा.) हिं. मुं इ. सिंध प्रा हैद्राबाद जि. तालुक्याचें.

**दिपाळ** (ग्रा.) हिं. नेपाळ दे. खटमांडू. ५१ मैल. [दिशेस.

**दिपाळपूर** (ग्रा.) हिं. पं. इ. रावीचे कांठी.

**दिबांग** (न.) हिं. पू. ब्रह्मपुत्रेला मिळते.

**दिमावंद** (पर्व.) आशि. म. इराण दे.

**दियरबकर** (श. प्रां.) आशि. स. तुर्कस्तान दे.

**दिरंग** (गां.) हिं. बं. इ. ब्रह्मपुत्रा नदीचे कांठीं.

**दिरवो** (न.) हिं. आसामांतून निघून ब्रह्मपुत्रेस मिळते.

**दिलाहेग** (श.) यु. नं. फ्रान्स देशांत उत्तरेस.

**दिल्ली** (श.) हिं. वाय. प्रां. यमुना नदीवर फार प्राचीन-कालचें शहर. हें मोगलांचें राज. शहर होतें. ही पांडवांची प्रथम रणभूमि. येथें फार मोठमोठ्या लढाया व अनेक बादशहा होऊन गेले. हस्तिदंतावर चित्रें कोरणें, दागिन्यांचे पत्रीकाम, भिन्याचे काम, वाद्यांच्या तारा हीं कामें उत्तम [होतात.

**दिलेडका** (न.) यु. द. इटाली दे. आग्नेयीस.

**दिलोद** (श.) हिं. माळव्यांत भोपाळ सं. भोपाळचा. १७ मैल.

**दिव** (बे.) हिं. मुं. इ. काठेवाडच्या द. पोर्तुगीज सं.

**दिवारनगर** (श.) हिं. बं. इ. सिल्हट प्रां. सिल्हट प. ११ मैल.

**दिवें** (गां.) हिं. मुं. इ. पुणें जि. पुरंदर ता. यास मोठाला अवघड घाट आहे.

**दिसा** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. येथे लष्कराची छावणी [आहे.

**दिसांग** (न.) हिं. बं. इ. ब्रह्मपुत्रेला मिळते.

**दी** (न.) यु. मं. इंग्लंडांत व स्कॉटलंडांत.

**दीग** (श.कि.) हिं. वाय. प्रां. कानपूर पर. काल्पीच्या. १५ मैल. २ गंगेच्या कांठीं अलाहाबाद पर. ई. होळकर

**दीगची** (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. औंध सं. [ल. १८०४.

दीग्रस (गां.) हि. वऱ्हाड प्रां. वणी जि. येथे बैलांचा मोठा बाजार भरतो.

दीजी (न.) हि. मुं. इ. ठाणे जि. अरबी समु. मिळते.

दुकौचा (गां.) हि. वाय. प्रां. मुरादाबाद पर. मुरादाबादचा.

दुग (श.) हि. मध्य प्रां. नागपूर जि. [२९ मै.

दुगदुगी (श.) हि. वाय. प्रां. फत्तेपूर प्रा. गंगेच्या काठीं.

दुघाड (गां) हि. मुं. इ. ठाणे जि. भिवंडी ता.

दुडी (श.) हि. मुं. इ. बेळगांव जि. बेळगांवचा. १६ मैल.

दुदस (न.) आशि. मं. तुर्कस्तान दे.

दुदर (न.) हि. मुं. इ. सिंध देशांत.

दुदाना (श.) हि. मुं. इ. गुजराथेंत.

दुधगंगा (न.) हि. मुं. इ. कोल्हापुर सं. पैंस वाऊन कृष्णेस

दुधगांव (गा.) हि. मुं. इ. सातारा जि. वाळवे ता. [मिळते.

दुधधारा (गां.) हि. मध्यप्रां. मंडळ जि. नर्मदा नदीचा धबधबा.

दुधना (न.) हि. निझामचे राज्यांत. हैद्राबाद शहराजवळून जाते. [१९ मैल.

दुनागिरी (श.) हि. वाय. प्रां. कमाऊन पर. अलमोड्याचा.

दुना (न) यु. प. रशियांत रीगा शहराजवळ बाल्टिक समुद्रास मिळते.

दुवस (न.) यु. प. फ्रान्सांत. ही ऱ्होन नदीस मिळते.

दुमकोट (श.) हि. वाय. प्रां. गुरवळ पर. श्रीनगरचा. १६ मैल.

दुमज (श.) हि. नेपाळ दे. काटमांडूचा. १५ मैल.

दुमाजी (गां.) हि. मध्य प्रां. शिवणी जि.

| | | |
|---|---|---|
| दुमाजी | (गां. न.) | हिं. मु. इ. सिंधप्रां. येथें उन्हाळ्यांत पाणी मु- [ळीच नसतें. |
| दुरक | (श.) | हिं. वाय. प्रां. अयोध्या पर. |
| दुरमापूर | (श.) | हिं. वाय. प्रां. औंध पर. घोग्रा नदीपा. ● मैल. |
| दुरवाई | (श.) | हिं. वाय प्रां. बुंदेलखं. जहागीर. |
| दुरहट | (श.) | हिं. बं. इ. हुगळी प्रां. कलकत्त्यापा. १२ मैल. |
| दुरामो | (श.) | हिं. वाय. प्रां. अयोध्या पर. फत्तेपूरपा. ५५ मैल. |
| दुराला | (गां.) | हिं. बं. इ. सरहिंदमध्यें कर्नुलपा. १० मैल. |
| दुरो | (न.) | यु. ख. स्पेन. व पोर्तुगाल ह्यांतून आऊन अत- लांतिक महासा. मिळते. |
| दुरंग | (श.) | हिं. ब. इ. जि. [होतें. |
| दुर्ग | (श.) | हिं. मध्य प्रां. रायपूर जि. ता. येथें कापड चांगलें |
| दुर्गवाडी | (गां.) | हिं. मु. इ. रत्नागिरी जि. चिपळूण ता. |
| दुर्गा | (गां.) | हिं. शिंद्याचे रा. ग्वाल्हेर पर. |
| दुर्गादास | (गां.) | हिं. वाय. प्रां. कानपूर पर. |
| दुर्गानग | (गां.) | हिं. वाय. प्रां. रामपूर पर. बरेलीपा. ४८ मैल. |
| दुर्गापूर | (श.) | हिं. बं. इ. मेमनसिंग प्रां. |
| दुलथे | (न.) | द. अमे. ब. त्याच्याच नदीला मिळते. |
| दुलासीदा | (गां.) | हिं. वाय. प्रां. बुंदेलखंडांत. |
| दुली | (श.) | हिं. ब. इ. सिरहून प्रां. |
| दुलीपगंज | (गां.) | हिं. वाय. प्रां. औंध पर. शहाजानपूरपा. २४ मैल. येथें बाजार मोठा भरतो. |
| दुलीया | (श.) | हिं. वाय. प्रां. फरकाबाद प्रां. रामगंगेच्या कांठीं. |
| दुवा | (श.) | हिं. म. इ. मच्छलीपट्टण प्रां. मच्छलीपट्टण पा. ५१ मैल. |

**दुशक** (श.) आशि. खं. अफगाणिस्तानांत शेहिस्तान प्रां. जरा सरोवराचे पूर्वेस शेहिस्तानचें मु. श.

**दुसखेड** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश. जि. भुसावळ ता.

**दुसाणें** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. पिंपळनेर ता. येथें कमोद तांदूळ पु. होतो.

**दुस्तारपूर** (श.) हि. वाय. प्रां. औध पर. सुलतानपूरपा. २६ मैल.

**दुहली** (श.) हि. वाय. प्रां. इटावा पर.

**देऊड** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. रत्नागिरी ता.

**देऊडगांव** (गां.) हि. मुं. इ. रत्नागिरी जि. रत्नागिरी ता.

**देऊळगांव राजा**(गां.)हि. वऱ्हाड प्रां. बुलढाणें जि.

**देऊळघाट** (गां.) हि. वऱ्हाडांत अजिंठ्याचे डोंगरांत. येथें पोलादी सामान चांगलें होतें.

**देतफर्द** (श.) यू. खं. इंग्लदांत.

**देनमार्क** (दे.) यू. खं. देश आहे. येथील लोकांस देन्स म्हण.

**देब्रेत्सीन** (श.) यू. खं. आस्ट्रिया दे. हंगारी प्रां.

**देबोइत** (न.) अमे. खं. कानडाचे रा. सेमक्लेअर सरोवराजवळून निघते.

**देराइस्मायलखान**(श.) हिं. पं. इ. सिंधुनदाचे कांठीं.

**देरागाजीखान**(श.) हिं. प. इ. सिंधूचे कांठीं.

***देराजत(दामन)***(प्रा.)हि. पं. इ. पेशावरच्या द. सुलेमान पर्वत आणि सिंधुनद ह्यांचे मध्यें.

***देरादून*** (प्रां.) हि. वाय. प्रां. गरवालच्या दक्षिणेस.

**देरामोबतेत** (श.) हिं. मुं. इ. सिंध प्रां. हैदराबाद जि. ता.

**देराही** (श.) हिं. मुं. इ. सिंध प्रां. शिकारपूर जि. तालुका.

**देजें** (गां.) हिं. मुं. इ. ठाणे जि. जव्हार सं.

**देलगादो** (भू.) आफ्रि. खं. पूर्वेस.

**देलागोआ** (उप.) आफ्रि. खं. पूर्वेस.

**देलावेर** (न. उप.) द. अमे. खं. युनैतेदस्तेतमध्यें.

**देवगड** (गां. सं.) हिं. मुं. इ रत्नागिरी. जि. ता. २ गुजराथेंत सं. ३ मध्यप्रां. छिंद्वाडा जि. ही गोंडराजाची रा. होती. ४ मोगलाईंत ह्यास हल्लीं दौलताबाद म्हणतात.

**देवगडबारीया** (श. सं.) हिं. मु. इ. गुजराथेत रेवाकाठा एजन्सीमध्यें संस्थान.

**देवथळ** (गां.) हि. नेपाळच्या द. ल १८१५ नेपाळी व इं.

**देवदार** (श. सं.) हिं. मुं. इ. वायव्येकडे सं.

**देव** (न.) हि. मुं इ. नगर जि. नगर व राहुरी ता. तून जाऊन मुळेस मि. २ नाशिक जि. सिन्नर ता. इचे कांठीं सिन्नर.

**देवनहल्ली** (श.) हिं. म. इ. म्हैसूर सं. येथें टिपूचा जन्म झाला.

**देवपूर** (गां.) हि. मुं. इ. नाशिक. जि. सिन्नर ता. [गीर गांव.

**देवरगांव** (गां.) हि. मुं. इ. नाशिक जि. चांदवड ता. जहा-

**देवराज** (गां.) हि. नेपाळच्या द. ल. १८१४ नेपाळ व इं.

**देवराष्टें** (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. खानापूर ता.

**देवरी** (गां.) हि मध्यप्रां. सागर जि. येथे धान्याचा व्यापार.

**देवरू** (न.) हिं. आसामांतून निघून ब्रह्मपुत्रेस मिळते.

**देवरूख** (गां.) हि. मुं. इ. रत्नागिरी जि. संगमेश्वर ता.

**देवलपाडा** (गां.) हिं. वऱ्हाडांत वर्धा नदीचे कांठीं.

**देवळाणें** (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. येवलें ता. येथे मोठी यात्रा भरते.

**देवळाली** (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. नाशिक ता.

**देवळी** (श.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. २ मध्यप्रां. वर्धा जि. गुरांचा मोठा व्यापार.

**देवळें** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. संगमेश्वर ता. २ सोलापुर जि. सांगोलें ता. माण नदीचे कांठीं.

**देवा** (श.) आफ्रि. खं. नैजर नदीचे कांठीं. [भरते.

**देवाव** (गां.) हिं. वऱ्हाड प्रां. एलिचपूर जि. येथें मोठी यात्रा

**देवलवाडा** (गां.) हिं. मध्य प्रां. वर्धा नदीचे कांठीं.

**देवसाने** (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि.

**देवासें(स)** (श.सं.) हिं. मध्य प्रांतांत माळव्यांत पवारांचें.

**देवीमणी घांट**(गां. घां.) हिं. मु. इ. धारवाड जि. सिरसीहून कुमठ्यास जाण्याचे रस्त्यावर. [मध्ये.

**देवीस** (सामु.) अमे. ख. ग्रीनलांद बे. व उत्तर अमे. ह्यांच्या

**देसमाने** (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. येवलें ता.

**देसवंडी** (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. राहुरी ता. देवनदीचे कांठीं.

**देमूर** (गां.) हिं. मु. इ. बेळगांव जि. बेळगांव ता.

**देहरी** (गां. घां.) हिं. मुं. इ. ठाणें जि. डाहाणु ता. २ नगर जि. *नगर व राहुरी यांमध्ये घांट.*

**देहू** (गां.) हिं. मुं. इ. पुणे जि. इंद्रायणी नदीचे कांठीं. *येथें म. साधु तुकाराम बोवांची समाधि आहे.*

**देहेगांव** (गां.) हिं. मुं.इ. गुजराथ प्रां. गायकवाडचे रा.कडी.ता-

**दैठाण** (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. जामखेड ता. [लुक्यांत.

**दोडी** (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. सिन्नर ता.

**दोदांड** (श.) हिं. बं.इ. भागलपूर प्रां. राजमहालपा. ४४ मैल.

**दोनिगाल**(उपसा.) यू. खं. अयर्लंद दे.

दोनेत्स (न.) यू. खं. रशियांतून निघून अझोप स. मिळते.
दोरा (श.) हिं. वाय. मां. भोपाळ सं. भोपाळपा. १८ मैल.
दोरावीड (श.) हिं. म. इ. निजामचे राज्यांत.
दोहद (श.) हिं. मुं. इ. गुजराथ मां. पंचमहालमध्यें तालुका.
दौफ्रेन (पर्व.) यू. खं. नार्वे स्विदन ह्यांचे मध्यें उत्तर दक्षिण ५०० मैल लांब आहे. [यात्रा भरते.
दौराई (गां.) हिं. राजपु. अजमीरपा. ४ मैल. येथे मोठी
दौलतगड (श.) हिं. राजपु. उदेपूर मां. कोरी नदीचे कांठीं.
दौलतपूर (श.) हिं. मुं. इ. सिंधमध्ये सिंधुनदापा. १० मैल. २ वाय. मां. साहरणपूर पर. मोठा बाजार भरतो.
दौलताबाद (श. कि.) हिं. म. इ. निजामचे रा. येथें खर्ची कागद
दौलेश्वर (श.) हिं. म. इ. उत्तर सरकारमध्ये. [चांगले होतात.
दंदी (श. बं.) यू. खं. स्कातलंदांत. तागाचे वस्त्राकरितां प्रसिद्ध.
दंद्राहेड (भू.) हिं. द. सिलोनच्या द.
दंफ्रीस (श.) यू. खं. स्कातलंदांत.
दंबळ (श.) हिं. मुं. इ. धारवाड जि. तालुक्याचें गांव.
दांटा (श. रं.) हिं. मुं. इ. गुजराथ मां. महिकांठा एजन्सींत. येथें संगमरवरी दगड सांपडतो.
दांतिवाड (गां.) हिं. राजपु. जोधपूर सं जोधपुरपा. २१ मैल.
दांपूर (श.) हिं. वाय. मां. अलिगडपा. २२ मैल.
दिंडोरी (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. तालुका. धामण नदीचे कांठीं.
दिंदिगल (श. कि.) हिं. म. इ. मधुरा शहराचे उ. [कांठीं.
दुंग्रा (गां.) हिं. वाय. मां. कमाऊन पर. लोहगरू नदीचे

दांजिक (श.) यू. खं. जर्मनी देश. धान्याचे व्यापाराचें श.
दोंडाईचें (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. शिंदखेड ता.
दोंदाबेता (शिख) हिं. म. इ. निलगिरीचें शिखर.
दौंड (श.) हिं. मुं. इ. पुणें जि. भिमथडी ता. येथें रे-
लवे स्टेशन.
द्रवीळ (इ) (दे.) हिं. म. इ. मधुरा जावली ह्या जि. प्रदेशाचें नांव.
द्रसोनशन (बे.) द. अमे. खं. पाटागोनियाचे. द.
द्रानथीम (श.) यू. खं. नार्वेत पश्चिम अंगास.
द्राव (न.) यू. खं. आस्त्रिया दे. दान्यूब नदीला मिळते.
द्राविळ (दे.) हिं. म. देशाचे पूर्वीचे नांव.
द्राहा (न.) आफ्रि. खं. अतलांतिक महासा. मिळते.
द्रेसदेन (श.) यू. खं. जर्मनींत साक्सनीची राजधानी.
द्वारका (श. क्षे.) हिं. मुं. इ. गुजराथेंत काटेवाडच्या वायव्येस
गायकवाडचे सं. येथें श्रीकृष्णाचे देवालय आहे.
द्रिना (न.) यू. खं. रशियांत अर्केजल शहराजवळ श्वेत-
समु. मिळते. ७६० मे. लां.

## ध.

धडगांव (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. तळोदे ता.
धधुका (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. अमदाबाद जि. ता.
धनची (श.) हिं. नेपाळांत काटमांडूपा. ४२ मैल.
धनवड (गां.) हिं. म. इ. मोगलाईंत गदवाल सं. येथें लुगडीं
चांगलीं होतात.
धनेला (श.) हिं. सिंद्याचे राज्यांत ग्वालेर पा. ११ मैल.
धमटेरी (श.) हिं. मध्य प्रां. रायपूर जि. गहूं, कापसाचा व्यापार.
धमधा (गां.) हिं. मध्य प्रां. रायपूर जि.

धयाबंग (श.) हि. नेपाळांत कटमांडूपा २९ मैल.

धरणगांव (श.) हि. मुं. इ. खानदेश. जि. एरंडोल ता. येथें भिल्ल पलटण आहे.

धरमपूर (श.सं.) हिं. म. इ. सालेमपा. ३३ मैल. २ ठाणें जि. चे उत्तरेस सं. रजपुत राजाचें.

धरमपुरी (श.) हिं. माळव्यांत धार सं. धारपा. २९ मैल.

धरोल (सं. श.) हि. मुं. इ. गुजराथेंत सं.

धर्मपुरी (गां.) हिं. मुं. इ. सोलापुर जि. माळशिरस ता.

धर्मशाळा (श.) हि. हिमालय पर्वतावर आहे. येथे इ. स. १८६३ त लार्ड एलजिन ग. ज. मरण पावला.

धवलगिरि (शिख.) हिं. हिमालय पर्वताचें शिखर उं. २६८२६ फूट.

धाडरी (श.) हिं. माळव्यांत धार सं. महुपा. ४९ मैल.

धाता (श.) हिं. वाय. प्रां. फत्तेपूर पर. यमुनेच्या कांठीं.

धान (न.) हिं. मुं. इ. कृष्णेस मिळते.

धानरा (श.) हिं. वाय. प्रां. गुरवळ पर.

धानापूर (श.) हि. वाय. प्रां गाझीपूर पर. गंगेच्या कांठीं.

धानोरें (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. चोपडें ता.

धावडी (श.) हि. म. इ. निजामचे रा. औरंगाबादपा. ३० मैल.

धावर (सरो.) हि. मुं. इ. गुजराथेंत.

धात्रा (श.) हि. मध्य प्रां. चंद्रापा. ३० मैल. चांदा जि. येथें वैनगंगा व वर्धा यांचा संगम झाला. मग इला प्राणहिता म्हणतात.

धामणगांव (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. अकोलें ता.

धामणंद (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. खेड ता.

**धामणसें** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. रत्नागिरी ता.
**धामनूर** (श.) हि. वाय. प्रां. बिजनूर पर. मुरादाबादपासून १७ मैल.
**धामा** (श.) हि. बं. इ. संबळपूर पर. संबळपूरपा. १६ मैल.
**धामापूर** (गां.) हि. मुं. इ. रत्नागिरी जि. मालवण ता.
**धामूड** (गां.) हि मु. इ. कोल्हापूर सं. करवीर पेट्यांत.
**धायडी** (प्रव.) हि. मध्य प्रां. नेमाड जि. नर्मदेचा.
**धार** (श. सं.) हि. माळव्यांत इंदुरचे पश्चिमेस पवारांचें सं. येथें किल्ला आहे दु. बाजीराव इ. स. १७७२ त
**धारजण** (न.) हिं. मुं. इ. ठाणे जि. जव्हार सं. [जन्मला.
**धारमंडा** (श.) हि. बं. इ. मिदनापूर पर. मिदनापूरपा. ६ मैल.
**धारवाड** (श.) हि. मुं. इ. द. महाराष्ट्रांत जि. चे ठिकाण.
**धारा** (श.) हिं. बं. इ. भागलपूर पर. राजमहालपा. ५० मैल. [मैल.
**धारानगर** (श.) हि. वाय. प्रां. अयोध्या पर. फत्तेपुरपा. ४०
**धारी** (श.) हि. मुं. इ. काठेवाडांत गायकवाडाचे सं. [मैल.
**धारीडेब** (गां.) हिं. वाय प्रां. कमाऊन पर. श्रीनगरपा. १०
**धारूर** (श.) हिं. म. इ. निजामचे रा.
**धालगांव** (श.) हि. मुं. इ. सातारा. जि. मिरज सं.
**धावरी** (न.) हि. मुं. इ. ठाणे जि. कल्याण ता. [वाड सं-
**धिणाकी** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. काटेवाड पर. गायक-
**धिणोधर** (शिख.) हिं. मुं. इ. कच्छ प्रां. मध्यधार पर्वताचें.
**धिनीसा** (श.) हिं. नेपाळ दे. [मैल.
**धिरीयापूर** (श.) हि. वाय. प्रां. अलिगड पर. अलिगडपा. १९

धुनडगड (श.) हिं. म. इ. निजामचे रा. हैदराबादपा.
धुनगुरी (श.) हिं. वाय. प्रां. औद पर. [१९ मैल.
धुनटालेओ (गां.) हिं. शिद्याचे राज्यांत.
धुनवा (श.) हिं. राजपु. जेसलमीर पर. जेसलमीरपा.५मैल
धुपदाळ (गां.) हिं. मुं. इ. बेळगांव जि. गोकाक ता.
धुम (श.) हिं. नेपाळांत.
धुमडा (श.) हिं. मध्य प्रां. नागपूर जि.
धुमरा (श.) हिं. बं. इ. कटक प्रां.
धुरकोट (श.) हिं. नेपाळ देशांत. [४१ मैल.
धुरी (गां.) हिं. वाय. प्रां. सरहिंद पर. लुधियानापा.
धुरीयापूर (श.) हिं. बं. इ. गोरखपूर पर. अजिमगडपा.३४मैल.
धुलीअट (श.) हिं. शिंद्याचे रा. महूपा. ८० मैल.
धुस (श.) हिं. वाय. प्रां. बनारस प्रां. बनारसपा. १० मैल.
धुळें (श.) हिं. मुं. इ. खानदेश जि. चें ठिकाण. पांझरेच्या काठीं. कापसाचा व किराणे जिनसांचा पु. व्यापार चालतो. स. १८७२ त पुरानें वाहावलें होतें.
धूपगड (शिख.) हिं. मध्य प्रां. सातपुड्याचें उंच शिखर.
धोआ (श.) हिं. शिंद्याचे रा. ग्वाल्हेरपा. २० मैल.
धोडप (गां. कि.) हिं. मुं. इ. नाशिक जि. चांदवड ता. येथें काळीचा चुना होतो.
धोडंबें (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. चांदवड ता. येथें विड्याचीं पानें व केळीं पु. होतात.
धोत्री (गां.) हिं. मुं. इ. सोलापुर जि. सोलापुर ता.

धोत्रें (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. कोपरगांव ता. येथें मोठी यात्रा भरते.

धोपेश्वर (गां.) हि. मुं. इ. रत्नागिरी जि. राजापूर ता. २ सातारा [जि. वांईपा. १२ मैल.

धोवहंग (गां.) हि. नेपाळ दे.

धोम (गां.) हि. मुं. इ. सातारा जि. साताऱ्याजवळ.

धोळका (श.) हि. मुं. इ. गुजराथ प्रां. अमदावाद जि. ता. येथे कापूस चांगला होतो. [दीचे उत्तरेस.

धोलपूर (श. सं.) हि. वाय. प्रां. आग्याचे नैर्ऋत्येस व चंबळा न-

धोलपुरी (श.) हि. वाय. प्रां. मुरादाबादपा. १६ मैल.

धोलरा (श.बं.) हि मुं. इ. गुजराथ प्रां. अमदावाद जि. बंदर. येथे मीठ फार पिकते.

धोलवड (गां.) हिं. मुं. इ. टाणे जि. डहाणू ता.

धोलाटघांट (घां.) हिं. नेपाळ दे. काटमांडूपा. २७ मैल.

धौली (न.) हिं. वाय. प्रां. घोघरा नदीस मिळणारी.

धंतुरीया (बे.) हिं. मु. इ. गुजराथ प्रां. भडोच जि. नर्मदा नदींत.

धांगद्रा (श.) हि. मु. इ. गुजराथ प्रां. झाल सं. चे.

धांदरफळ (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. संगमनेर ता.

धोल (गा.) हि. मुं. इ. महिकांठा एजन्सींत हालरमध्ये.

## न.

नकरीकाह्र (श.) हिं. म. इ. गंतूरपा. १५ मैल.

नगणइनपोल (श.) हिं. निजामचे रा. गोदावरीचे कांठीं.

नगनर (श.) हिं. म. इ. उत्तरकानड्यांत.

नगर (अहमदनगर) (श.) हि. मुं. इ. नगर जि. चें टाणें. हे शहर इ. स. १४९० निजामशहा बादशहानें वस-

मिळें. येथें इ. स. १७०७ त औरंगजेब मेला. २ सिंधुनदाचे कांठीं व्यापाराचें श. १ पं. जाबचे उत्तरेस गांव येथील बायकांची सौंदर्याविषयीं ख्याती आहे.

**नगरकोट** (श.) हिं. पं. इ. गिजनीचा महमूद ह्यानें लुटलें होतें.

**नगरदेवळें**(गां.जहा.)हिं. मुं. इ. खानदेश जि. पाचोरे ता.

**नगरसुल** (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. येवलें ता.

**नगरसोगा** (श.) हिं. म. इ. निजामचे राज्यांत.

**नगरिया** (श.) हिं. वाय. प्रां. फरकाबाद प्रा. फरकाबा.पा. १८ मैल. २ अलिगड प्रां.

**नगलदिनी** (श.) हिं. म. इ. बलेरी प्रां. [३६ मैल.

**नगलपिली** (श.) हिं. म. इ. निजामचे रा. हैदराबादपा.

**नगवरम** (श.) हिं. म. इ. राजमद्रीपा. १५ मैल.

**नगलीया** (श.) हिं. वाय. प्रां. मुरादाबाद प्रां. गंगेच्या कांठीं.

**नगशिवरी** (न.) हिं. वऱ्हाड प्रां. एलिचपूर जि.

**नगेरी** (श.) हिं. म. इ. अरकाट प्रां. अरकाटपा. १२ मैल.

**नगोर** (गां.) हिं. वाय. प्रां. औंध पर. गंगेच्या कांठीं कानपूरपा. ३० मैल.

**नगोरी** (न.) हिं. बं. इ दिनाजपूर प्रां. निघून महानदीस मिळते. २ मद्रास इ. तंजावर प्रा.

**नग्रा** (श.) हिं. वाय. प्रां अजिमगड पर.

**नघीर** (श.) हिं. मध्य प्रां. नागपूर जि.

**नजफगड** (श.) हिं. वाय. प्रां. दिल्ली जि. दिल्लीपा. १६ मैल. ल. इ. स. १८५७ बंडवाले व इं.

**नजरी** (श.) हि. मुं. इ. सातारा जि.

**नजिराबाद** (श.) हिं. वाय. प्रां. बिजनूर पर. येथें नजीबउद्द्वल्याची कबर आहे.

**नज्द** (प्रां.) आशि. खं. अरबस्तान दे. मध्यभागीं येथील मु. श. रैद. येथें घोडे उत्तम होतात.

**नडियाद** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. खेडा जि. तालुका.

**नणदी** (गां.) हिं. मुं. इ. बेळगांव जि. चिकोडी ता.

**नदबा** (श.) हि. बं इ. परनीथ प्रां. परनीथपा. २१ मेल.

**नदामीई** (गां.) हिं. वाय. प्रां. मिनपुरी पर. काळी नदीचे कांठीं.

**नद्या** (गां.) हिं. वाय. प्रां. भागीरथीचे कांठीं. येथे संस्कृत पाठशाळा होती. [जि.

**नदिया** (श.) हि. बं इ. प्राचीन राज. दिल्लीच्या दक्षिणेस

**नदुवतम** (गां.) हिं. म. इ.

**ननमोई** (शिख.) हि. मु. इ. कच्छमां. चांदवा पर्वताचें.

**नबाबगंज** (श.) हिं. बं. इ. दिनाजपूर प्रां. दिनाजपूरपा. ४६ मैल. २ राजशाई प्रां. ३ रंगपूर प्रां. रंगपूरपा.

**नभा** (सं. श.) हि. पं इ. शिकलोकांचें. [२ मैल.

**नरखेड** (गां.) हि. मध्यप्रां नागपूर जि.

**नरगड** (श.) हिं. शिंद्याचे रा. ग्वाल्हेर सं. निमचपा. ३०मैल.

**नरगाणहाठी** (श.) हिं. म. इ. म्हैसूर सं.

**नरगल** (श.) हिं. मुं. इ. धारवाड जि.

**नरगुंद** (श.) हि. मुं. इ. धारवाड जि. ता. हें संस्थान इ. स. १८५७ त. खालसा केलें.

**नरवडें** (गां.घां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. माल्वण ता.

**नरडाणी** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. शिंदखेड ता.
**नरदेवघांट**(गां.घां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि.
**नरनाला**(श. कि.) हिं. मध्यप्रां. नागपूर जि.
**नरवडें** (घां. गां.) हिं. मु. इ. रत्नागिरी जि. देवगड ता.
**नरसापूर** (श.) हिं. मुं. इ. ठाणें जि. मुंबईपा. ३८ मैल.
**नरसिंगगड** (श.) हिं. बं. इ. पुरणिया. जि.
**नरसिंगनुगड**(श.) हिं. बं. इ. टिप्रा जि. टिप्रापा. ३९ मैल.
**नरसिंगपूर** (श.) हिं. मध्य प्रां. जि. सागरच्या दक्षिणेस व्यापाराचें ठिकाण आणि कोळसा सांपडतो.
**नरसिंगपेठ** (श.) हिं. म. इ. निजामचे रा. [२८ मैल.
**नरसिंगबील** (श.) हिं. म. इ. विजगापट्टण प्रां. विजगापट्टण. पा.
**नरसिंगा** (श.) हिं. बं. इ. पूर्वेस ओरिसा प्रां.
**नरसीपूर** (श.) हिं. म. इ. म्हैसूर सं.
**नरसिंहगड**(गां.कि.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. पूर्वेस.
**नरसिंहपूर** (श.) हिं. मुं. इ. पुणें जि. इंदापूर ता. निरा व भीमा ह्यांचे संगमावर.
**नरसोबाचीवाडी** (श.) हिं. मुं. इ. कृष्णेच्या कांठीं.
**नरीकाळाबाग**(गां.) हिं. पं. इ. येथपा. सिंधु नदीस अटक हें नांव मिळालें आहे.
**नरियाद** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. खेडा जि. तालुका.
**नरेगल्ल** (श.) हिं. मुं. इ. द. महाराष्ट्रांत धारवाड जि.
**नर्तशिन्स्क** (श.) आशि. खं. चीन दे.
**नर्मदा** (न.) हिं. मध्य प्रांतात गोंडवणांतून अमरकंटक पर्वतापा. निघून पश्चिमेस भडोच्या जवळ अरबी स.

मिळते. इला उगमाजवळ पिलधारा व दूधधारा असे दोन धबधबे आहेत. लां. ८०० मै.

**नलचिरा** (श.) हि. बं. इ. बकरगंज प्रां. हे व्यापाराचे ठिकाण.

**नलटी** (श.) हि. बं. इ. विरभूम प्रां.

**नलनवाड** (श.) हि. मुं. इ. सोलापूर जि.

**नलदुर्ग** (श.कि.) हि. म. इ. निजामचे रा.

**नलगड** (श.) हि. म. इ. निजामचे रा. भीमेच्या कांठीं.

**नलिंग** (गां.कि.) हि. मुं. इ. खानदेश जि. मालेगांवपा. २४मैल.

**नलीया** (श.) हि. मुं. इ. कच्छप्रां.

**नवगांव** (श.) हि. बं. इ. जि.

**नवलपूर** (गां.) हि. मुं. इ. खानदेश जि. तळोदे. ता.

**नवसरी** (श.) हि. मुं. इ. सुरत जि. गायकवाडचे रा.

**नवागड** (श.) हि. राजपु. उदेपूर प्रां. २ मध्यप्रां. बिलासपूर. जि.

**नवानगर** (श. सं.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. काठेवाड पर.

**नवापूर** (गां.) हि. मुं. इ. खानदेश जि. पिपळनेर ता. येथील हवा फार रोगकारक आहे.

**नवाबगंज** (श.) हिं. वाय. अलाहाबादपा. १२ मैल. २ औध प्रां. लखनौपा. १५ मैल. ३ बरेलीपा. २० मैल. ४ बं. इ. पुरणियापा. १५ मैल. [चित्रपट होतात.

**नवाशहर** (श.) हि. पं. इ. जलंदर प्रां. येथे कापडावरील

**नवीजुनीबेज** (गां.) हि. मुं. इ. नाशिक. जि कळवण ता. येथे गूळ व कमोदी तांदूळ पुष्कळ होतो.

**नसरापूर** (गां.) हि. मुं. इ. पुणे जि. शिवगंगा नदीचे कांठीं. भोर सं. येथे आंबे चांगले होतात.

**नसिराबाद** (श.) हिं. बं. इ. मेमनसिंग प्रां. २ मुं. इ. खानदेश जि. ३ राजपु. अजमीर सं. ल. छा.

**नस्तरपुर** (गां.) हिं. मुं इ. नाशिक जि. नांदगांव ता. येथें शनीचें स्थान आहे.

**नहरगुर** (श.) हिं. रजपुतस्थानांत.

**नहान** (श.) हिं. वाय. प्रां. गरवाळ पर. सिरमूरची राजधा.

**नाअ** (श.) हिं. बं. इ. व ब्रह्मदेश ह्यांचे सीमेवर.

**नाईल** (न.) हिं. म. इ. कोईमतूर प्रां. निघून कावेरीस मिळते.

**नाईलरसी** (सरो) यू. खं. रशिया देशांत.

**नागचाना** (श.) हिं. राजपुतान्यांत जेसलमीर प्रां. वाळवंटांत.

**नागज** (गां.) हिं. मुं. इ. सातार जि. तासगांव ता.

**नागडें** (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. येवलें ता. येथें लुगडीं चांगलीं होतात.

**नागनवाडी** (श.) हिं. मध्य प्रां. माळव्यांत.

**नागनूर** (गां.) हिं. मुं. इ. बेळगांव जि. गोकाक ता.

**नागपूर** (श.) हिं. वाय. प्रां. गुरवळ मा. २ मध्यप्रांताचें मुख्य श. नागनदीच्या कांठीं ही भोंसल्याची राजधानी स० १८५३ त इंग्रजसरकारचे ताब्यांत आली. देशी कापडाचा व्यापार चालतो. या प्रांतांत अभ्रक, संगमरवरी दगड सांपडतात.

**नागमती** (न.) हिं. मुं. इ. कच्छ प्रां.

**नागरतास** (गां.) हिं. वऱ्हाडांत वासिम जि. येथें कार्तिक महिन्यांत मोठी यात्रा भरते.

**नागरा** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. भडोच जि. तालुका.

**नागल** (श.) हिं. वाय. प्रा. विजनूर पर. हरिद्वारपा. २२ मैल.

**नागलकोट** (श.) हिं. पं इ. पजाब जि.

**नागलगांव** (गा.) हिं मु. इ. नगर जि. शेवगाव ता. येथे सि- [तागुफा आहे.

**नागलवाडी** (श) हिं. मध्य प्रा. माळव्यात.

**नागवा** (गा.) हिं. वाय प्रा. गुरवळ पर. येथे नारिंगे फार होतात २ मुजफरनगर प्रा.

**नागा** (डों) हिं ब. इ पूर्वेस आसामात.

**नागाई** (तला.) हिं मु. इ. खानदेश जि. पिंपळनेर ता. गाव अ- सून तेथें तलाव आहे.

**नागापट्टण** (श.ब) हिं. म इ. कारोमांडल किना यावर.

**नागाबाई** (न.डो) हिं मु इ. नगर जि नगर ता. या नदीचा नळ बाधून आणून नगर शहरात पाणी आणिले आहे.

**नागांव** (श गा) हिं. वाय. प्रा. मुरादाबाद पर. मुरादाबादेपा. २८ मैल. २ असामात गोहातीच्या पूर्वेस. ३ मु. इ. अलिबाग जि

**नागासाकी** (श ब) आशि. य. जपान दे कियुसियु बेटात.

**नागुल** (न.) हिं. म इ. गजाम प्रा. तिथून शिकाकोलम- वरून बंगालच्या उपसा मिळते. [वाची खाडी.

**नागोटणा** (श) हिं मु. इ. कुलाबा जि. अबानदीवर याच ना-

**नागोर** (श) हिं. राजपुता येथे लोखडी काम चागले होते.

**नाचणखेडे** (गा.) हिं. मु. इ खानदेश जि जामनेर ता.

**नाजफगड** (श.) हिं. वाय. प्रा कानपूर पर. २ दिल्लीपा १५ मै.

**नाझरें** (गा.) हिं. मु इ. सोलापुर जि. सागोले ता. माण नदीचे काठीं.

**नार्टिंगहाम** (श.) यू. खं. इंग्लंदांत ट्रेंट नदीवर. येथें जाळीदार कापड तयार होतें.

**नार्टे** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. राजापूर ता.

**नाडगांव** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. भुसावळ ता.

**नाताल** (दे.श.) आफ्रि. खं. द. आफ्रिकेंत.

**नातु** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. खेडें ता.

**नातुरी** (श.) हिं. बं. इ. राजशाई प्रां.

**नातेंपोतें** (गां,) हिं. मुं. इ सोलापूर जि. माळशिरस ता.

**नादगिरी** (गां.कि.) हिं. मुं. इ. सातार जि. कोरेगांव जि.

**नादोर** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. रेवाकांठा एजन्सींत राजपिंपळा सं.

**नाधवडें** (गां.) हिं. मुं इ. कोल्हापूर सं. बावडा जहागिरींत.

**नानकीन** (श.) आशि. खं. चिनांत येथें साटीन चांगली होते.

**नानच्यांगफू** (श.) आशि. खं चिनांत.

**नानज** (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. संगमनेर ता.

**नानडीया** (श.) हिं. राजपु. शिरोई पर.

**नानमो** (गां.) हिं. वाय. प्रां. कानपूर पर. फत्तेगडपा. ४९ मैल. येथें मोठा बाजार भरतो.

**नानलिंग** (पर्व.) आशि. खं. चिनांत.

**नानून** (श.) हिं. वाय. प्रां. मिरत पर.

**नानोरी** (श.) हिं. बं. इ. शहाबाद पर.

**नानौन** (गां.) हिं. वाय. प्रां. अलिगड प्रां. अलिगडपा.११ मै.

**नान्टस** (श.) यू. खं. फ्रान्स दे. आरमाराची जागा.

**नापसीर** (गां.) हिं. राजपुतान्यांत.

नापूत (श.) हिं. बं. इ. पूर्वेस पेगू प्रां.
नाप्लिआ (श.बं.) यू खं. ग्रीस देशांत.
नाभा (सं.श.) हिं. प. इ.
नामगो (श.) हिं. बं. इ. सिक्कीमांत दार्जिलिंगपा. ४० मैल.
नामजंग (श.) हिं. नेपाळांत काली नदीचे कांठीं.
नामनगर (श.) हिं. मुं. इ. ठाणे जि. चे उत्तर हद्दीवर धरम-
पूर सं. व शहर ह्याचें पूर्वीचे नांव.
नामलिंग (पर्व.) आशि. खं. चीन देशांत. [कांठीं.
नामुकी (श.) हिं. पं. इ. भावलपूर सं. सतलज नदीचे
नामदिंग (श.) हिं. ब. इ. पूर्वेस असाम दे.
नामपूर (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. बागलाण ता. मोसम
नदीचे कांठीं. वमोद व गूळ पु. होतो.
नामूर (श.) यू. खं. बेलजममध्यें.
नायकोट (श.) हिं. नेपाळ दे. [कांठीं.
नायगांव (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. सिन्नर ता. गोदावरीचे
नायग्रा (न.) अमे. ख. कानडाच्या द. इरी व अंतारियो या
दोन सरोवरांच्या मध्यें आहे. इचा जो धबधबा
आहे तसा पृथ्वीवर दुसरा कोठेंही नाहीं.
नायडोंगरी (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. नांदगांव ता.
नारकाफ (गां.) यू. खं. इंग्लंदांत.
नारकी (श.) हिं. वाय. प्रां. आग्र्यापा. २५ मैल.
नारगोल (गां.) हिं. मुं. इ. ठाणे जि. डाहाणू ता.
नारजोली (श.) हिं. बं. इ. मिदनापूर प्रां.
नारदी (न.) हिं. मुं. इ. नाशिक जि. येवलें ता. निघून

नगर जि. कोपरगांव ता. संवत्सराजवळ गो-
देस मिळते.

**नारफाक** (प्रां.) यू. खं. इंग्लंदांत पूर्वेकडील.

**नारमिनी** (श.) हिं. मुं. इ. सिंध प्रां. हैदराबाद जि. तालुका.

**नारविच** (श.) यू. खं. इंग्लंद दे. नारफाक प्रांताचें.

**नारायणगड** (गां.) हिं. वाय. प्रां. सरहिदमध्यें. येथें मातीचा किल्ला
असून भोंवतालीं मोठा खंदक आहे. २ बंगाल
इ. मिदनापूर प्रां. ३ मुं. इ. पुणें जि. जुन्नर
ता. किल्ला.

**नारायणगांव** (श.) हिं. मुं.इ.पुणें जि. जुन्नर ता. भीमानदीचे कांठीं.

**नारायणगंज** (श.) हिं. बं. इ. डाका प्रां. डाकापा. ६ मैल.

**नारायणपूर** (श.) हिं. म. इ. निजामचे रा. हैदराबादपा. ३०
मैल. २ मध्यप्रां. नागपूर जि.

**नारिंग्रे** (गां.) हि. मुं. इ. रत्नागिरी जि. देवगड ता.

**नारिशा** (न.) हिं. भूतानांतून येऊन ब्रह्मपुत्रेस मिळते.

**नारुकोट** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. पंचमहाल एजन्सींत.

**नार्ते** (भू.) द. अमे. खं. द. अमे. दक्षिणेस.

**नार्थऐलँद** (बे.) आशि. खं. चे आग्नेयीकडे न्युझीलंद बेटसमू-
हांत हें आहे.

**नार्थचानल**(खाडी.) यू. खं. इंग्लंद व ऐर्लंद ह्यांचेमध्यें सेंतजार्जची
खाडी व ऐरिश समु. ह्यांमध्यें.

**नार्थंबर्लंद** (प्रां.) यू. खं. इंग्लंद दे. उत्तरेस.

**नार्थसी** (समु.) यू. खं. इंग्लंद व देन्मार्क ह्यांचेमध्यें.

**नार्दकिन** (भूमि.) यू. खं. नार्वे देशाचें उत्तर टोंक.

**नार्दलंद** (प्रां.) यू. खं. स्वीदन देशाचा एक प्रांत.

**नार्विथ** (श. बं.) यू. खं. इंग्लदांत.

**नार्वे** (दे.) यू. खं. उत्तरेकडील देश. यांत लोखंड पु. सांपडते. व आगपेट्या होतात.

**नालकीहार** (गां.) हिं. बं. इ. ढाका जि. येथें मोठी यात्रा भरते.

**नालगुण** (न.) हिं. मुशायरमध्ये.

**नालचा** (श.) हिं. माळव्यात धार सं. महूपा. २७ मैल. येथे मोठा बाजार भरतो.

**नालापटन** (गां.) हिं. वाय. प्रां. गुरवळ पर. केदारनाथ पा. १८ मैल.

**नालंदाचा विहार**(मठ.) हिं. बं. इ. बहार प्रां.

**नाविगेतर्स** (बे.) आशि० खं. पासिफिक महासागरांत पोलिनिशिया विभागांत.

**नाशिक** (श.) हिं. मुं. इ. नाशिक जि. गोदावरीचे कांठीं प्रसिद्ध क्षेत्र. येथें दर बारा वर्षांनीं मोठी यात्रा भरते ती वर्षभरपर्यंत चालू असते. तांब्यापितळेचीं व चांदीचीं भांडीं उत्तम होतात. गोदेच्या एका बाजूस नाशिक व दुसरे बाजूस पंचवटी; तशींच दोहीं अंगांस घाट, देवळें पुष्कळ असल्यामुळे गोदेच्या कांठचा देखावा फार मनोरम दिसतो. असा हिंदुस्थानांत देखावाही कोठे नाहीं.

**नासा** (श. सं.) यू. खं जर्मनी द.

**नासाऊ** (श.) अमे. खं. मध्यअमेरिकेच्या लगत्यास न्यू प्राविदेन्स बेट आहे त्याचे मुख्य शहर.

**नासूमान** (श.) हिं. पं. इ. चिनाव नदीचे कांठीं.

**नाहन** (श.) हिं. डोंगरी सं. सिरपुर प्रां. येथें पाहण्यासारखीं तीन देवळें आहेत.

**नाहनी** (श.) हिं. बं. इ. छोटानागपूर प्रां.

**नाहपरा** (श.) हिं. बं. इ. बिरभूम प्रां.

**नाहुरबदी** (गां.) हिं. राजपु. जोधपूर सं. जोधपूरपा. १२ मैल. येथे दोन तलाव आहेत.

**नाळेगांव** (गां.) हिं. मुं. इ. ठाणे जि. वसई ता.

**निकचो** (श.) हिं. राजपु. जयपूर प्रां.

**निकरी** (श.) हिं. बं. इ. कटक प्रां. कटकपा. १७ मैल.

**निकेया** (श.) हिं. पं. इ. ह्यास हल्लीं मोंग शहर म्हणतात.

**निकेशिया** (श.) आशि. खं. तुर्कस्तानाचे प. सैप्रस बेटांत.

**निकोबार** (बे.) आशि. खं. द. अंदमान बेटाचे दक्षिणेस.

**निकोलेएफ** (श.बं.) यु. खं. रशियांत तुर्की समुद्रांत येथें दारूगोळा व आरमार हीं असतात.

**निकोलैवस्क** (श.) आशि. खं. रूस दे.

**निगडी** (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. कोरेगांव ता. येथें रंगनाथस्वामींची समाधी आहे.

**निगापट्टण** (श.) हिं. म. इ. त्रिचनापल्ली परगण्यांत.

**निगोग** (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. नगरपा. १२ मैल.

**निगोही** (श.) हिं. वाय. प्रां. शहाजहानपूर प्रां. शहाजहानपूरपा. १७ मैल.

**निग्राईस** (भू.) हिं. पू. ब्रह्म दे. च्या नैर्ऋत्येस. [दक्षिणेस.

**निघिशिया ऊर्फ सौदान** (दे.) आफ्रि. खं. सहारा वाळवंटाच्या

**निग्रेस** (भू.) हिं. ब्रह्म दे. पेगूच्या दक्षिणेस.

**निग्रो** (न.) अमे. खं. पाटागोनिया दे. उत्तरेस.

**निग्रोपांत** (बे.) यु. खं. ग्रीस देशाचे पूर्वेस.

**निघोज** (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. पारनेर ता.

**निजने इकोलिन्स्क** (बे.) आशि. खं. चीनदे. कोलिया नदींत.

**निजामचें राज्य** (सं.) हिं. म. इ. उत्तरेस, मुंबई इ. पूर्वेस. ह्याचें. मुख्य शहर हैदराबाद मुशी नदीचे कांठीं. हें निजामउल्मुल्खानें स. १७१९ त स्थापिलें.

**निजामपूर** (श.) हि. मुं. इ. खानदेश जि. २ ठाणे जि. भिवंडी-जवळ, ३ वऱ्हाड प्रां. ४ कुलाबा जि. माण ता.

**निजामाबाद** (श.) हि. वाय. प्रां. अजिमगड प्रां. अजिमगड पा. ८ मैल. २ प. इ. गुजराणवाला जि. येथें चाकू होतात त्यांस स्क्रू, हूक, कानस, कातर, बूच काढण्याचा स्क्रू व तीन पातीं अशीं असतात.

**निसर** (गां.) हि. मुं. इ. खानदेश जि. नंदुरबार ता. [६ मैल.

**निडपुटी** (गां.) हि. वाय. प्रां. अलाहाबाद पर. अलाहाबादेपा.

**निदगुंदा** (श.) हिं. म. इ. निजामचे रा.

**निदजीगळ** (श.) हिं. म. इ म्हैसूर प्रां.

**निदाबोली** (श.) हि. म. इ. मच्छलीपट्टण प्रां.

**निदीगळ** (श.) हिं. म. इ. म्हैसूर सं.

**निनवा** (श.) हिं. राजपुतान्यांत. येथे मोटा बाजार भरतो.

**निनवी** (श.) आशि. खं. तुर्कस्तानांत प्राचीनकाळीं मोठें व्यापाराचें शहर होतें. हें १८४६ त सांपडलें.

**निनिटल** (श.) हिं. वाय. प्रां. कमाऊन प्रां.

निपाणी (श.) हिं. मुं. इ. दक्षिणमहाराष्ट्र दे. बेळगांव जि.

निपाळ (दे.) नेपाळ पहा. [कांठीं.

निफाड (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. तालुका. कादवेच्या

निफोन (बे.) आशि. खं. पूर्वेस जपान देश. त्यापैकीं एक बेट.

निमगांव (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. मालेगांव ता.

निमच (श.) हिं. राजपु. जोधपूर सं. अजमीरपा. ४५ मै. येथें लष्करची छावणी. १८५७ त बंड.

निमपो (भू.बं.) आशि. खं. चीन देशांत.

निमरा (गां.) हिं. मुं. इ. सिंध देशांत.

निमरुत (श.) आशि. खं. तुर्कस्तान दे. मोसल नदीचे कांठीं.

निमसुराई (गां.) हिं. वाय. मां. अलाहाबादपा. ७ मैल.

निमसोर (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. खटाव ता.

निमोण (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. संगमनेर ता.

नियंगबेथ (श.) हिं. ब्रह्म दे. इरावतीचे कांठीं.

नियपर (न.) यू. खं. रशियांतून निघून काळ्या समुद्रास मिळते. १२०० मैल लांब. [मिळते.

नियमन (न.) यू. खं. रशियांतून निघून बाल्तिक समुद्रास

निया (श.) हिं. मुं. इ. कच्छ प्रांतांत.

नियाकोट (श.) हिं. नेपाळ दे. झेलमपा. ३३ मैल. [३४ मैल.

नियागड (श.सं.) हिं. बं. इ. ओरिसा प्रां. २ रेवा प्रां. रेव्यापा.

नियागांग (श.) हिं. वाय. प्रां. साहरणपूर जि.

नियागांव (श.) हिं. बं. इ. मिडनापूर प्रां. मिडनापूरपा. २८ मैल.

नियाबास (गां.) हिं. वाय. प्रां. बुलंद प्रां. दिल्लीपा. १० मैल.

निरगुडसर (गां.) हिं. मुं. इ. पुणें जि. घोडनदीचे कांठीं.

निरती (गां.कि.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. वेंगुर्ले ता.
निरबद (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. [ भोर, सांगवी.
निरा (न.) हिं. मुं. इ. भोर सं. निघून भीमेला मिळते. कांठीं
निरिदा (श.) अमेरि. सं. न्यूकातनचे राजधानीशहर.
निर्गुडा (न.) हिं. वऱ्हाड प्रां. अजिंठ्याचे डोंगरांतून निघून वर्धा नदीस मिळते.
निर्मळ (श.) हिं. म. इ. निजामचे रा. गोदावरीचे कांठीं. ठाणे जि. वसई ता. येथे यात्रा भरते.
निलकुमार (न.) हिं. बं. इ. ब्रह्मपुत्रेला मिळते.
निलकोट (श.) हिं. म. इ. मदुरा प्रां. मदुरापा. २८ मैल.
निलगड (श.) हिं. व. इ. ओरिसा प्रां.
निलगा (श.) हिं. म. इ. निजामचे रा.
निलगिरी (पर्व.) हिं. पूर्व व पश्चिम घांटांचीं टोंकें सांधणारा मद्रास इ. पूर्वपश्चिम डोंगर. येथे वाद्यें तयार [करितात.
निलगुंदीर (श.) हिं. म. इ. निजामचे रा.
निलगुलाब (श.) हिं. पंजाबांत.
निलियालियम (श.) हिं. म. इ. मलबार प्रां.
निलेगांव (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि.
निलो (श.) हिं. मुं. इ. सिंधमध्यें झेलम नदीवर.
निवलगड (श.) हिं. वाय. प्रां. औंधमध्ये.
निवळी (गां.) हिं. मुं. रत्नागिरी जि० चिपळूण ता.
निवा (न.) यू. सं. रशियांतून निघून सेंतपीतर्स शहराजवळून बाल्तिक समु. मिळते.
निवाहाला (श.) हिं. मुं. इ. सिंध प्रां. हैदराबादपा. १० मैल.

**निवेंडी** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. रत्नागिरी ता.
**निस्तर** (न.) यू. खं. रशियांत ओदेसा शहराजवळ तुर्की स-मुद्रास मिळते.
**निळी नैल** (न.) आफ्रि. खं. अबिसिनियांतून निघून पांढरी न-दीस मिळते. [ पर्वताच्या उत्तरेस.
**निळे पर्वत** (पर्व.) पासिफिक महासाग. आस्ट्रालिया बे. बोरगान
**नुकुर** (श.) हिं. वाय. प्रां. सहारणपूर पर. सहा. पा. १४
**नुगीना** (गां.) हिं. वाय. प्रां. गुरवळ जि. [ मैल.
**नुटवाबारा** (श.) हिं. बं. इ. रामगड पर.
**नुधोयापूर** (गां.) हिं. वाय. प्रां. कानपूर पर.
**नुनी** (श.) हिं. बं. इ. भागलपूर प्रां.
**नुनिओ** (श.) हिं. राजपुतान्यांत जोधपूर प्रां. [ मैल.
**नुबीगंज** (श.) हिं. वाय. प्रां. मिनपुरी प्रां. मिनपुरीपा. २४
**नुम** (न.) हिं. वऱ्हाड प्रां. अकोला जि. पूर्णेस मिळते.
**नुरनगर** (श.) हिं. बं. इ. टिपरा प्रां. टिपरापा. २० मैल. २ वाय. प्रां. मुजफरपा. २२ मैल.
**नुरपूर** (श.) हिं. पं. इ. बारीदुआबमध्ये. येथें शाली हो-तात. २०० फूट उंचीचा किल्ला आहे. २ ल-खनौपा. १४ मैल. ३ सिंधमध्यें झेलमपा. २२ मैल. ४ वाय. प्रां. बिदनूर प्रां.
**[illegible]धड** (श.) हिं. माळव्यांत भोपाळ सं. भोपाळपा. ४१ मैल.
**[illegible]खळ** (श.) हिं. वाय. प्रां. कानपूरपा. १८ मैल.
**नुरी** (श.) हिं. वाय. प्रां. गाझीपूर पर. गाझीपूरपा. २९ मैल. गंगेच्या कांठीं.

नुरीयावल (गां.) हिं. वाय. प्रां. बरेलीमध्यें.
नुरे (गां.) हिं. वाय. प्रां. औधमध्यें.
नुरेंबर्ग (श.) यू. खं. जर्मनींत बवेरियांत येथें पुस्तकालय आहे व कारागिरीचे जिन्नस पुष्कळ होतात.
नुलकर (श.) हि. भूतान सं.
नुरचिरला (श.) हि. म. इ. मच्छलीपट्टण प्रां.
नुलावाडी (श.) हिं. वाय. प्रां. गोरखपूर पर. येथें मातीचा किल्ला आहे. गोरखपूरपा. ४५ मैल.
नुवरी (गां.) हिं. वाय. प्रां. कानपूर पर. काल्पीपा. २२ मैल.
नुवीपूर (गां.) हिं. वाय. प्रां. कानपूर पर. येथें मुसलमान लोकांची वस्ती फार आहे.
नुसरपूर (श.) हि. मुं. इ. सिंध प्रां. हैद्राबाद पर.
ने (सरो.) यू. खं. आयर्लंदांत. [ नदीस मिळते.
नेकर (न.) यू. खं. जर्मनींत वर्तमबर्ग सं. तून जाऊन न्हैन
नेकली (श.) हि. बं. इ. मेमनसिंग प्रां.
नेग्रा (न.) अमे. खं. अतलांतिक महा. मिळते.
नेग्राईस (भू.) आशि. खं. पूर्वेकडील द्वीपकल्पाचे पश्चिमेस.
नेझ (भू.) यू. खं. नार्वे देशाचे दक्षिणेस.
नेदरलंद (हालंद) (दे.) यू. खं. बेलजमच्या उत्तरेस.
नेदाद (श.) हिं. मुं. इ. गुजराथेंत राजपिंपळा सं.
नेन (न.) यू. खं. इंग्लंदांत.
नेपाळ (दे.) हिं. हिमालय पर्वताचे पायथ्याजवळ स्वतंत्र सं. गुरखे लोकांचा देश.
नेबखीरा (श.) हिं. वाय. प्रां. बुलंद प्रां.

**नेमाड** (प्रां.) हि. मध्यप्रांतांत वऱ्हाडच्या उत्तरेस नर्मदेच्या कांठीं. यांत लोखंड सांपडतें.

**नेर** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. धुळें ता. येथें मोठा बाजार भरतो.

**नेर परसोपंत** (गां.) हिं. वऱ्हाडांत वणी जि. येथें रंग चांगला होतो.

**नेर पिंगळाई** (गां.) हि. वऱ्हाडांत उमरावती जि.

**नेरी** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. जामनेर ता. वाघुर नदीचे कांठीं. येथें गुरांचा मोठा बाजार भरतो.

**नेरळ** (गां.) हिं. मु. इ. कुलाबा जि. कर्जत ता. येथून माथेरानच्या डोंगरावर जाण्याचा रस्ता १० मैल चढणीचा आहे.

**नेरें** (गां.) हि. मुं. इ. कुलाबा जि. पनवेल ता.

**नेरोली** (श.) हि. राजपुतान्यांत जयपूर सं. २ वाय. प्रां. मुरादाबादपा. २५ मैल.

**नेर्ले** (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. वाळवें ता.

**नेलसन** (न.) अमे. खं. हृदसनच्या उपसागरास मिळते.

**नेलूर** (श.) हि. म. इ. पन्यार नदीच्या कांठीं. याच नांवाचा प्रांत. व जि.

**नेवरें** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी. जि. रत्नागिरी ता. २सोलापुर जि. माळशिरस ता.

**नेवादा** (श.) अमे. खं. स्वतंत्र सं.

**नेवासें** (ग.) हिं. मुं. इ. नगर जि. नेवासें, ता. नेवासें बुद्रुक व खुर्द अशीं आहेत. बुद्रुक चंद्रचूड यांस जहागीर आहे.

**नेस** (न.) यू. खं. स्कातलंदांत उत्तर खाडीस मि.

**नेसरी** (गां.) हिं. मुं. इ. कोल्हापूर सं. कापशी ता.

**नेमून** (न.) हिं. मुं. इ. खानदेश जि. पिंपळनेर ता.

**नैकनारी** (घां.) हिं. म. इ. उत्तर अर्काटांत.

**नैजर(जोलिबा)**(न.)आफ्रि. खं. सौदन दे. येऊन दोन मुखांनीं गिनीच्या अखातास मिळते. २३०० मैल लांब.

**नैताळें** (गां.) हि. मुं. इ. नाशिक जि. निफाड ता. येथे शनीची यात्रा भरते.

**नैदरलंद** (दे.) यू. ख. हालंद देशाचे नांव.

**नैनीताल** (श.) हिं. हिमालयांतील डोंगरी प्रदेशांत आहे. तेथें युरोपिअन लोकाची वस्ती पुष्कळ आहे.

**नैयाग्रा** (न.) अमे. ख. उ. अमे. ब्रिटिश अमेरिकेत. या नदीस मोठमोटाले धबधबे आहेत.

**नैल** (न.) आफ्रि. ख. मिसर दे. विक्टोरिया नाएंजा सरोवरांतून निवून भूमध्य स. मिळते. सर्व पृथ्वींत लांब आहे. लांबी ३००० मैल.

**नैसरी** (श.) हि. मुं. इ. कोल्हापूर सं. बेळगांवपा. १९ मैल.

**नैसा** (सरो.) आफ्रि. ख. मध्य आफ्रिकेंत.

**नोक** (गा.) हि. राजपुताना जसलमीर सं.

**नोबनगंज** (गां.) हिं. वाय. प्रां. औध पर. फत्तेगडपा. ५० मैल.

**नोयलगंज** (श.) हि. वाय. प्रां. औध पर.

**नोयवाला** (श.) हिं. पंजाब इ. येथे गहूं फार पिकतो.

**नोवाझेम्ब्ला** (बे.) आशि. ख. रशियाचे उत्तरेस. याच नांवाची सामुद्रधुनी.

**नोवास्कोशिया**(प्रां.) अमे. खं. कानडाचे राज्यांत

**नोशहरा** (श.) हि. मुं. इ. सिंध प्रां. शिकारपूर जि. तालुका.

**नोसम** (श.) हिं. म. इ. कडपा जि. येथें कातड्यावर चित्रें काढितात.

**नौशहा** (श.) हिं. मुं. इ. सिंध प्रां. हैदराबाद जि. तालुका.

**नंदगंज** (गां.) हि. वाय. प्रां. गाझीपूरपा. १० मैल.

**नंदगड** (श.) हिं मुं. इ दक्षि. महारा. बेळगांव जि.

**नंदनवन** (श ) हि. म. इ. नेलोर प्रां. नेलोरपा. ८० मैल.

**नंदपूर** (श.) हि. मध्य प्रां. नागपूरपा. ४४ मैल.

**नंदलापूर** (गां.) हि. वाय. प्रां. आग्र्यापा. ९ मैल.

**नंदादेवी** (शिख.) हि. हिमालयाचें शिखर कमाऊन प्रां.

**नंदापूर** (श.) हिं. म. इ. निजामचें रा.

**नंदीगण** (श.) हि. म. इ. मच्छलीपट्टण प्रां.

**नंदीदुर्ग** (श.) हि. म. इ. म्हैसूर सं. बंगलोरच्या उत्तरेस.

**नंदीयल** (श.) हि. म. इ. कर्नुल प्रां. कर्नुलपा. ३८ मैल.

**नंदुरबार** (श.) हि. मु. इ. खानदेश. जि. तालुका.

**नंदोली** (श.) हि. वाय. प्रां. अलिगड प्रां. आग्र्यापा. ४१ मैल. येथे आठवड्यांतून दोन वेळ बाजार भरतो.

**नंबळगिरी** (श.) हि. म. इ. बलारी प्रां.

**नांद** (गां.) हि. राजपु. अजमीर स.

**नांदगांव** (श.) हि. मुं. इ. ठाणे जि. मुंबईपा. ४० मै. २ नाशिक जि. तालुका व रेलवेस्टेशन. ३ मोगलाईत जाण्याचा रस्ता. एलीचपूरपा. १० मैल. ४ मध्य प्रां. रायपूर जि. सं. श.

**नांदगांवकाजी** (गां.) हि. वऱ्हाडांत उमरावती जि.

नांदणी (गां.) हिं. मुं. इ. कोल्हापूर सं. शिरोळ पेट्यांत
नांददेवी (पर्व.) हिं. हिमालयापैकीं एका रांगेस ह्म. कमाऊन प्रां.
नांदन (श.) हि. वाय. प्रां. आग्र्यापा. २० मैल.
नांदरूख (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. मालवण ता.
नांदल (गां.) हि. मुं, इ. सातारा जि. फलटणजहा.
नांद्रा (गां.) हिं. राजपु. जोधपूर प्रां. [ कांठीं.
नांद्रें (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. जळगांव ता. गिरणेच्या
नांदिवडें (गां.) हिं मुं. इ रत्नागिरी जि. रत्नागिरी ता.
नांदु (गां.) हिं. वाय. प्रां. गुरवळ पर.
नांदुनूज (श.) हि. म. इ. निजामचे रा. नगरापा. ५० मैल.
नांदुर (गां.) हि. मुं. इ. नगर जि. राहुरी ता. निरेच्या कांठीं.
२ नाशिक जि. निफाड ता. गंगेच्या कांठीं.
नांदुरा (गां.) हिं. वऱ्हाडात बुलढाणा जि. घाण नदीचे कांठीं.
नांदेड (श.) हि. म. इ. निजामचे रा. गोदेच्या कांठीं. २
खानदेश जि. एरंडोल ता. तापीच्या कांठीं.
नांदेर (श.) हिं. म. इ. निजामचे. रा. गोदेच्या कांठीं. येथें
लहान मुलांकरितां कालेज आहे.
नांदोद्रा (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. अमदाबादेपा. ११ मैल.
निंगपो (श. बं.) आशि. खं. चीन दे. पूर्वकिना.
निंभोरें (गां.) हि. मुं. इ. खानदेश जि. सांवदे ता. रेलवेस्टे.
निंबगांव जावळी (गां.) हि. मुं. इ. नगर जि. संगमनेर ता. येथें
त्रिंबकजी डेंगळ्याचे वंशज राहतात. २ पुणें जि.
निंबगांव दावडी (गां.) हिं. मुं. इ. पुणें जि. खेड ता.
निंबसर (श.) हिं. मुं. इ. साताऱ्यापा. १५ मैल.

**निंबळक** (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. राहुरी ता. येथून देव
नदी निघाली आहे.

**निंबाळकर** (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. फलटणचे जहागिरींत.

**निंबेरा** (गां.) हिं. राजपु. येथें उत्तम प्रकारचीं देवळें आहेत.

**न्यासी** (सरो.) आफ्रि. खं. पूर्वभागीं.

**न्याहाळोद** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. धुळें ता. [बेटांत.

**न्यु आयर्लंद** (बे.) आशि. खं. द. पासिफिक महासा. आश्चालेशिया

**न्यु आरलीयन्स** (श.) अमे. खं. उ. अमे. मिसिसिपी नदीवर. का-
पसाकरितां प्रसिद्ध.

**न्यु कातेल** (श.) यू. खं. स्वित्सर्लंदांत.

**न्यु कालिफोर्निया** (प्रां.) अमे. खं. युनैतेद्स्तेतसमध्यें पश्चिमेस प्रांत.

**न्युकासल** (श.) यू. खं. इंग्लंदांत. येथें दगडी कोळशाच्या मो-
ठाल्या खाणी आहेत.

**न्युकालिदोनिया** (बे.) आशि.खं. द. पासि. म. साग. आश्चोलिशियांत.

**न्युगिनी** (बे.) आशि. खं. द. पासि. म. सा. आश्चेलिशियांत.

**न्युग्वातीमाला** (श.) अमे. खं. मध्य अमे. ग्वातीमाला देशाची राज.

**न्युचानेन** (सरो.) यू. खं. स्वित्सर्लंदमध्यें.

**न्युन** (भू.) आफ्रि. खं. उत्तर आफ्रिकेच्या पश्चिमेस.

**न्यु पोर्ट** (श.) यू. खं. इंग्लंदांत मन्मौथ प्रां. अस्क नदीवर.

**न्युप्राविदेन्स** (बे.) अमे. खं. मध्य अमे. जवळ.

**न्युफौंदलंद** (बे.) अमे. खं. कानदाच्या राज्याच्या पूर्वेस.

**न्युबीया** (प्रां.श.) आफ्रि. खं. उत्तर आफ्रि. इजिप्तच्या राज्यांत.

**न्युबेलन** (पर्व.) आफ्रि. खं. पूर्व आफ्रिकेंत.

**न्युब्रन्सविक** (गां.) अमे. खं. कानडाचे रा.

**न्युब्रितन** (बे.) आशि. खं. द. पासिफिक महा. आस्ट्रेलियांत.

**न्युयार्क** (श.) अमे. खं. युनैतेदस्तेतसमध्यें मिसिसिपी नदीचे काठीं. जगांत दुसरे प्रतीचें मोठें व श्रीमान् शहर.

**न्युरी** (बं. श.) यू. खं. आयर्लंदांत. येथें तागाचें व कापसाचे कापड तयार होतें.

**न्युसैबिरिया** (बे.) यु. खं. उत्तरेस आर्तिक महासागरांत. [बेटांत.

**न्युसौथवेल्स**(प्रां.) आशि. खं द. पासिफिक महासाग. आस्त्रालिया

**न्युहालंद** (बे.) आशि.खं. द. पासि. महासाग. पूर्वीचे आस्त्रालिया बेटाचें नांव. [बेटसमूहांत.

**न्युहेब्रेदीज** (बे.) आशि. ख. द. पासि. महासाग. आस्त्रालिया

**न्हावी** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. सावदे ता. २ सातारा जि. न्हावी नांवाचा घाट आहे. पुणें जि.

**न्हावें** (गां.) हिं. मुं. इ. टाणे जि. मुरबाड ता.

## प.

**पचमढी** (शिख.) हिं. मध्य प्रदेशांत उत्तम हवेचें ठिकाण. हुसंगाबाद जि.

**पट्टण** (श.) हिं. मुं. इ. गुजराथेंत गायकवाड सं ता.२ नेपाळ दे. येथे पंचरंगी लहानमोठ्या घंटा करितात.

**पटणा** (सं. श.) हिं. मध्य प्रां. संबळपूर जि.

**पडघें** (गां.) हिं. मु. इ. टाणें जि. भिवंडी ता.

**पणदरें** (गां.) हिं. मुं. इ. पुणें जि. भिमथडी ता.

**पतकोई** (पर्व.) हिं.हिमालयाचा पूर्वेकडील आसाम प्रांतांतील फाटा.

**पतियाला** (सं. श.) हिं. पं. इ. सं. सीक लोकांचे सं.

**पतिरम** (श.) हिं. बं. इ. दिनाजपूर प्रां.

**पथरिया** (गां.) हिं. मध्य प्रां. दमोह जि.

**पदमगड** (कि.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. मालवण ता.

**पद्मा** (न.) हिं. गंगानदीस जलधी नांवाचा फांटा फुटल्यावर हें नांव आहे.

**पद्मालय** (डों.) हिं. मुं. इ. खानदेश जि. एरंडोल ता. एरंडोला-जवळ. या डोंगरावर गणपतीचें स्थान व तलाव आहे.

**पद्माळें** (तळें.) हिं. मुं. इ. कोल्हापुराजवळ. [ पुष्कळ होतें.

**पनवेल** (श. बं.) हिं. मुं. इ. कुलाबा जि. तालुका. येथें मीठ

**पनामा** (श.संयो.अखा.) अमे. खं. द. अमे. व.उ. अमे. ह्यांस जोड-णारी जमीन; शहर व अखात.

**पन्ना** (श. सं.) हिं. मध्य हिं. पन्ना सं. येथे हिरे सांपडतात.

**पन्नागड** (श.) हिं. मध्य प्रां. जबलपूर जि. लोखंडाच्या खाणी.

**पन्नार** (न.) हिं. म. इ. हैसूर सं. चंद्रदुर्ग किल्ल्याज-वळून निघून नेलुरावरून बंगालच्या उपसा. मि.

**पन्यार** (गां.) हिं. माळव्यांत सिंद्याचे रा. ग्वाल्हेरच्या द. १२ मै.ल. १८४३ सिंदे व ई.

**पन्हाळा** (कि. गां.) हिं. मुं. इ. कोल्हापूर सं. कोल्हापुराप. ६ कोशांवर. येथें गोपीचंदन, पिवडी, शाडू, हुरमुजी सांपडते.

**पवना** (श.) हिं. बं. इ. जि. [छावणी आहे.

**परतवाडा** (श.) हिं. वऱ्हाड प्रां. एलीचपूर जि. येथें लष्करची

**परतापपुरी** (श.) हिं. बं. इ. मिडनापुर प्रां. मिडनापुरपा. २८ मैल. २ वाय. प्रां. मिनपुरी प्रां.

**परतापपुर** (गां.) हिं. वाय. प्रां. मिरत जि. मिरतपा. ८ मैल.

**परतूर** (श.) हिं. म. इ. निजामचे रा.

**परदु** (शिख.) यू. खं. स्पेन दे. पिरिनीज पर्वताचें.

**परशुराम क्षेत्र** (दे.) हिं. मुं. इ. सह्याद्रीचे पश्चिमेकडील पट्टी. ह्यास कोंकण म्हणतात.

**परसगड** (श.) हिं. मुं. इ. दक्षिण महा. बेळगांव जि. तालुका.

**परसवाडा** (श.) हि. मध्य प्रां. बालाघाट जि. ता.

**पराशीका** (दे.) आशि. खं. इराण देशाचें पूर्वीचें नांव.

**परिंचें** (गां.) हिं. मुं. इ. पुणें जि. पुरंदर ता.

**परीम** (बे.) हिं. मुं. इ. गुजराथेंत भरूचच्याजवळ नर्मदा नदीचे मुखाजवळ.

**परुळें** (गां.) हि. मुं. रत्नागिरी जि. वेंगुर्लें ता.

**पर्गुंकिउर्ले** (पर्व.) आशि. खं. चिनई तार्तरींत.

**पर्थ** (श.) यू. खं. स्कातलंदांत व्यापाराकारितां प्र.

**पर्वान** (गां.) आशि. खं. अफगाणिस्तानांत द. पिशेनदरीजवळ–ल. १८४० दोस्तमहमद व इं.

**पलनी** (डों.) हि. म. इ. मदुरा परगण्याचे उत्तरेकडील रांग.

**पलसवारा** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि.

**पलिकत** (सरो.) हिं. म. इ. कर्नाटकांत कारोमांडल किनाऱ्यावर. लां. ४० मैल व रुंदी ६ मैल.

**पलिटाणा** (श. सं.) हिं. मुं. इ. काठेवाडांत गोहिलवाडा भागांत

**पलियद** (श.) हि. मुं. इ. गुजराथेंत राजकोटपा. ४१ मैल.

**पल्लिकोट** (बे.) हिं. म. इ. मद्रासचे उत्तरेस.

**पळूस** (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. तासगांव ता.

**पवनमावळ** (गां.) हिं. मुं. इ. भोर सं.

**पवना** (न.) हिं. मुं. इ. पुणें जि. लोहगडाखा. निघून दा-
पोडीजवळ मुळेस मिळते. इचे कांठीं चिचवड
[ आहे.

**पवनी** (गां.) हिं. मध्यप्रां. वैनगंगेचे कांठीं.

**पश्चिम तार्तरी** (दे.) आशि. खं. तार्तरी देशाचा पश्चिम भाग.

**पश्चिमेकडील डोंगराळ प्रदेश.** (दे.) हिं. मुं. इ. सिंध प्रां.
कराची जि. भाग. [ सौंदत्ती येथें.

**पसरगा** (गां.) हिं. मुं. इ. बेळगांव जि. ता. गांव, पण कचेरी

**पसरगी** (गां.) हिं. मुं. इ. सातार जि. वांई ता.

**पसरणी** (गां. घां.) हिं. मुं. इ. सातारा जि.

**पसेसावली** (गां.) हिं. मुं. इ. सातार जि. खटाव ता.

**पहूर** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. जामनेर ता.

**पळसण** (गां.) हिं. मुं इ. नाशिक जि. पेठ ता.

**पळसदेव** (गां.) हिं. मुं. इ. पुणें जि. भीमेच्या कांठीं.

**पळसनेर** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. सिरपूर ता.

**पळसी** (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. खंडाळें पेट्यांत.

**पळस्पें** (गां.) हिं. मुं. इ. कुलाबा जि. पनवेळ ता. [ वर.

**पॉइंट दिगाली** (श.बं.) आशि. खं. सिलोन बेटांत दक्षिण किनाऱ्या-

**पॉइंट पेद्रो** (श.बं.) आशि. खं. सिलोन बेटांत. [ मिळते.

**पाईनगंगा** (न.) हिं. वऱ्हाडांत अजिंठ्याचे डों. निघून वर्धा नदीस

**पाईन घांट** (प्रां.) हिं. वऱ्हाडांत घांटाखालचा प्रदेश.

**पाकचन** (श.) हिं. पूर्वेस तेनासरीम प्रां.

**पाकणगोलो** (श.) हिं. हिमालयाचे पायथ्याशीं नेपाळ दे.

**पाकणी** (गां.) हिं. मुं. इ. सोलापूर जि. सोलापूर ता.

**पाकांग** (सरो.) हिं. काश्मीर दे. याची लांबी १०० मैल, रुंदी ३ मैल आहे. यांतून श्यायक नदी निघते.

**पाकोलिया** (श.) हिं. वाय. प्रां. गोरखपूरपा. ३६ मैल.

**पाक्स (पास्को)** (बे.) यू. खं. भूमध्य समु. अयोनियन बेटांत.

**पाग** (श.) हिं. भूतान दे. गोदावरीचे कांठीं

**पागड** (श.) हिं. म. इ. म्हैसूर सं.

**पाघमम्यु** (श.) हिं. ब्रम्ह दे. इरावतीचे कांठा.

**पाचगणी** (डों.) हिं. मुं. इ. सातारा जि. कृष्णेच्या उजवे आंगच्या रांगेतील डोंगर.

**पाचमारी** (श.) हिं. वऱ्हाडांत महादेवाचे डोंगरावर. येथें नागपूरचे आपासाहेब इ. स. १८१८ सालीं लपून बसले होते.

**पाचवड** (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. वांई ता.

**पाचीपोन्त** (गां.) हिं. म. इ. विशगापट्टणमध्ये.

**पाचु** (गां.) हिं. वाय. प्रां. कमाऊन पर.

**पाचेगांव** (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. राहुरी ता. मुळा आणि प्रवरा ह्यांच्या संगमावर.

**पाचेरी सडा** (गां.) हिं. मु. इ. रत्नागिरी जि. चिपळूण ता.

**पाचोरें** (श.) हिं. मुं. इ. खानदेश जि. तालुक्याचें गांव. हिवरा नदीच्या कांठीं.

**पाटकूळ** (गां.) हिं. मुं. इ. सोलापुर जि. माढें ता.

**पाटगांग** (श.) हिं. वं. इ. रंगपुरी प्रां.

**पाटगांव** (गां.) हिं. मुं. इ. कोल्हापूर सं. भुदरगड पेठ्यांत.

**पाटण** (श.) हिं. वाय. प्रां. कमाऊन पर. २ सातारा जि. ता. चें गांव.

**पाटणा (पाटलीपुत्र, कुसुमपुर)** (श.) हिं. बं. इ. बहार प्रां. गंगेच्या कांठीं. चंद्रगुप्ताची राज. जि. २ खानदेश जि. चाळीसगांव ता. किल्ला.

**पाटणा सांगवी** (गां.) हि. मध्य प्रां. नागपूर जि.

**पाटणें** (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. मालेगांव ता. गिरणेच्या कांठीं. येथें गुळ व कमोदी तांदूळ पुष्कळ होतो.

**पाटन** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. गायकवाडचे रा.

**पाटपूर** (गां.) हिं. वाय. प्रां. कानपूर जि. काल्पीपा. २० मैल.

**पाटरी** (गां.) हि. वाय. प्रां. गुरवळ जि. भागीरथीचे कांठीं.

**पाटस** (गां.) हि. मुं. इ. पुणें जि. भिमथडी ता. रेलवेस्टे.

**पाटागोनिया** (दे.) अमे. खं. द. अमेरिकेंत.

**पाटोडी** (श.) हि. राजपु. जोधपूर सं.

**पाटोधी** (गां. जहा.) हि. वाय. प्रां. जुधर प्रां. या गांवीं जाण्याचे रस्ते वाळवंटाचे आहेत व. गाड्या चालत नाहींत.

**पाठणकोट** (श. कि.) हिं. पं. इ. शहाजहान बादशहानें बांधला.

**पाडळी** (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. तालुक्यांत.

**पाणिपत** (गां. रणभूमि.) हि. पं. इ. यमुना नदीवर. येथें फार मोठ्या लढाया झाल्या. ल. १७६१ पेशवे व गिलचे.

**पातनाताल** (श. बं.) अमे. ख. द. अमे. ब्राझिल दे.

**पाताळगंगा** (न.) हि. मुं. इ. ठाणे जि. अरबी समु. मिळते.

**पातुडें** (गां.) हिं. वऱ्हाडांत अकोला जि.

**पातुर** (गां.) हिं. वऱ्हाडांत अकोला जि. येथील डोंगरांत खोदींव देऊळ आहे.

**पातोस** (सरो.) अमे. खं. द. अमे. ब्राझिल दे.

**पातोंडें** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. चाळीसगांव ता. येथें पेरू व लिंबें चांगलीं व पुष्कळ होतात. २ खानदेश जि. एरंडोल ता. तापीचे कांठीं.

**पात्री** (श.) हिं. म. इ. निजामचे रा. गोदावरीचे कांठीं. २ गुजराथेंत अमदाबाद जि. येथें मोठा तलाव आहे.

**पाथर्डी** (श.) हिं. मुं. इ. नगर जि. शेवगांव ता. व्यापाराची पेठ. २ नाशिक जि. नाशिकजवळ गांव.

**पादर** (श.) हिं. म. इ कोईमतूर पर.

**पादरा** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रा. गायकवाडचे रा.

**पादशहागंज** (गां.) हिं. मु. इ. खानदेश जि. सुलतानपूर पर.

**पादशहापूर** (श.) हिं. वाय. प्रां. गुरवळ पर. दिल्लीपा. २५ मैल.

**पादशहामहाल** (श.) हिं. वाय. प्रां. सहारणपूर जि. येथें शहाजहान बादशहानें राजवाडा बांधिला आहे.

**पादशहापूर** (गां.) हिं. मु. इ. द. महाराष्ट्र दे. बेळगांव जि. तालुका. पण येथील ठाणें बेळगांवीं असतें.

**पादांग** (श.) आशि. खं. द. पासिफिक महासा. मलाशिया बेटांतील संदा बेटांत. अचीन याचे राजधा. श.

**पाद्रा** (श.) हिं. मुं. इ. गुजराथेंत बडोद्यापा. ८ मैल.

**पाद्रु** (श.) हिं. मध्य प्रा. राजपु. लुनी नदीवर.

**पान** (न.) हिं. मुं. इ. खानदेश जि. पिंपळनेर ता.

**पानगानी** (न.) आफ्रि. खं. हिंदीमहासागरास मिळते.

**पानात** (दे.) हिं. वाय. प्रां. काल्पी प्रांताचे नांव.

पानकांग (सरो.) हिं. पं. इ. हें १०० मैल लांब आहे.
पानगांव (गां.) हिं. मुं. इ. सोलापुर जि. बार्शी ता.
पानवाडा (श.) हिं. बं. इ. भागलपूरपा. २५ मैल.
पानिगांग (श.) हिं. बं. इ. पू. असाम दे.
पानीथ (गां.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. बडोद्याहून २८ मैल.
पान्सवळ (श.) हिं. म. इ. तंजावर प्रां. तंजावरपा. २७ मैल.
पापडी (गां.) हिं. मुं. इ. ठाणें जि. वसई ता.
पापरघाट (गां.) हिं. वाय. प्रां. औधमध्यें सुलतानपूर प्रां.
पापासा (श.) अमे. खं. लाप्लाता दे. अंदीज पर्वताचे पूर्वेस.
पावंग (श.) हिं. बं. इ. पू. ब्रह्मदे.
पावळ (गां.) हि. मुं. इ. पुणें जि. शिरूर ता.
पामनी (श.) हिं. मध्य प्रां. नागपूर जि.
पामपूर (श.) हिं. म. इ. नेलोर प्रां.
पामवर (श.) हिं. पं. इ. चिनाब नदीचे कांठीं.
पामबेन (सामु.) हि. दक्षिणेस हिंदुस्थान व रामेश्वर बेट ह्यामध्यें.
पामिरेनिया (प्रां.) यू. खं. जर्मनींत प्रशिया सं.
पायसुनी (न.) हिं. वाय. प्रां. बुंदेलखंडांत.
पायांगहु (सरो.) आशि. खं. चिनांत.
पार (न.) हिं.मुं.इ. गुजराथ प्रां. सुरत जि. तापीस मिळते.
पारकर (श.) हिं. मुं. इ. सिंध प्रां. हैदराबाद जि. ता.
पारगांग (श.) हिं. बं. इ. संबळपूर प्रां.
पारगांव (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. श्रीगोंदें ता. येथें विड्याचीं पानें चांगलीं होतात.
पारघांट (घां.) हि. मुं. इ. सातारा जि. महाबळेश्वराजवळ.

**पारनेर** (श.) हिं. मुं. इ. नगर जि. ता. हंगा नदीचे कांठीं. येथें लुगडीं, अडकित्ते चांगले होतात. ह्यास पाराशरक्षेत्र ह्मणतात.

**पारनेरा** (डों.) हि. मुं. इ. गुजराथ प्रां. सुरतेजवळ.

**पारपुनद** (श.) हि. म. इ. पारपुनद जि. तालुका.

**पारमबलोरी** (श.) हि. म. इ. त्रिचनापल्लीपा. ४२ मैल.

**पारमा** (श.) यु. खं. इताली दे. येथें पन्हेर चांगली होते.

**पारस** (श.) हिं. वऱ्हाडांत रेलवेस्टेशन.

**पारसनाथ** (देऊळ) हिं. ब. इ. छोटानागपूरचे डोंगरावर जैन लोकांचे पवित्र स्थान.

**पारा** (नं. श.) अमे. खं. ब्राझिल दे.

**पाराग्वे** (दे.) अमे. खं. द. अमेरिकेंत देश.

**पारांतीज** (श.) हि. मुं. इ. गुजराथ प्रां. अमदावाद जि. तालुका

**पारादंग** (श.) हि. बं. इ. रंगपूरपा. २९ मैल.

**पाराना** (न.) अमे. खं. द. अमे. पाराग्वे दे. रिओपारा खाडीस मिळते.

**पारानावाईना** (न.) अमे. खं. द. अमे. ब्राझिल दे. निघून अतलांतिक महा. सा. मिळते.

**पारामा** (भू.) अमे. खं. दक्षिण अमे. पेरू दे. वायव्येस.

**पारामांता** (श.) आशि. खं. द. पासिफिक महा. आस्त्रालेशियांत न्युसौथवेल्सांत.

**पारामारीवो** (श.) अमे. खं. द. अमे. डच ग्वायनाची राज.

**पारालाह** (घां.) हि. हिमालय पर्वतांत. [कादवेस मिळते.

**पाराशरी** (न.) हिं. मुं. इ. नाशिक जि. निफाड ता. तून जाऊन

**पारी** (श. बे.) हिं. राजपु. सिरोही पर. सिरोहीपा. ५ मैल. २ भुतानांत दार्जिलिंगपा. ७५ मैल. ३ अमे. खं. आटलांटिक महासागरांत.

**पारीना** (भू.) अमे. खं. द. अमे. पेरू दे. दक्षिणेस.

**पारीस** (श.) यु. खं. फ्रान्स दे. राजधानी. सीन नदीचे कांठीं. पृथ्वींत उत्तम शहरांतलें हें एक आहे.

**पारो** (श.) हिं. भुतान दे. २ बंगाल इ. छोटानागपूर प्रां.

**पारोपामिसस** (पर्व.) आशि. खं. इराण दे. उत्तर हद्दीवर.

**पारोळें** (श.) हिं. मुं. इ. खानदेश जि. अंमळनेर ता. व्यापाराची पेठ.

**पार्डी** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. सुरत जि. तालुका.

**पार्वती** (न.) हिं. वाय. प्रां. माळव्यांतून नि. चंबळेस मिळते. २ सिंद्याचे रा. सिप्री गांवाजवळ निघून सिंद नदीस मिळते.

**पाल** (गां.) हिं. राजपु. जोधपूर सं. जोधपुरापा. ५ मैल. २ मुं. इ. सातारा जि. कऱ्हाड ता.

**पालकी** (श.) हिं. मुं. इ. सिंध प्रां.

**पालकोट** (श.) हिं. बं. इ. छोटानागपूर प्रां. [ कांठीं.

**पालखेड** (गा.) हिं. मुं. इ. नाशिक जि. दिंडोरी ता. कादवेचे

**पालगड** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. दापोली ता.

**पालगु** (श.) हिं. बं. इ. बहार प्रां.

**पालघर** (गां.) हिं. मुं. इ. टाणें जि. माहीम ता.

**पालघांट** (प्रां. बं.) हिं. म. इ. मलबार प्रां. येथें हैदरअल्लीनें एक उत्तम किल्ला बांधिला आहे.

**पालटी** (सरो.) आशि. खं. तिबेटांत.

**पालता** (श.) अमे. खं. द. अमे. लाप्लाता दे.

**पालदिओ** (श.) हिं. वाय. प्रां. बुंदेलखंडात.

**पालनपूर** (श. सं.) हिं. मुं. इ. गुजराथेंत.

**पालपा** (श.) हिं. नेपाळ दे.

**पालपूर** (श.) हिं. सिंद्याचे राज्यांत.

**पालम** (श.) हिं. वाय. प्रां. दिल्लीपा. १० मैल.

**पालमकोट** (श.) हिं. म. इ. तिनवेली प्रां.

**पालमाऊ** (गां.) हिं. बं. इ. येथें दगडी कोळशाच्या खाणी.

**पालमीरा** (श. भू.) आशि. खं. तुर्कस्तान देशांत दमास्कस प्रां. २ सिंहलद्वीपच्या उत्तरेस भूशीर. ३ म. इ.

**पालमीरास** (भू.) हिं. बं. इ. कटक प्रां. [ वैतरणा न. कांठीं.

**पालमैरा (तादमोर)** (श.) पालमीरा पहा.

**पालरी** (गां.) हिं. राजपुतान्यांत जोधपुर सं.

**पालर्मो** (श.) यू. खं. इटाली दे. दक्षि. सिसिली बेटाची राज.

**पालव्हरम** (श.) हिं. म. इ. चिंगलपट प्रां. चिंगलपटपा. ११

**पालशेत** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. चिपळूण ता. [ मैल.

**पालस्तैन** (प्रां.) आशि. खं. तुर्कस्तानांत पश्चिमेकडील प्रांत. यांत येशू ख्रिस्त जन्मला.

**पाला** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि.

**पालाकोलु** (श. बं.) हिं. म. इ. कारोमांडल किनाऱ्यावर येथें प्रथम डच लोक आले.

**पालातीवेत** (प्रां.) यू. खं. जर्मनींत.

**पालार** (न.) हिं. म. इ. कर्नाटकांतून निघून मद्रासचे दक्षिणेस बंगा. उपसा. मिळते. कांठीं अर्काट शहर.

**पाली** (श.) हिं. राजपु. जयपूर सं. चंद्रळेच्या कांठीं. लष्करची छावणी. २ वाय. प्रां. औधमध्यें गोमतीचे कांठीं. ३ गुरवळ प्रां. ४ गोरखपूर प्रां. ५ मुं. इ. ठाणे जि. कर्जत ता. ६ भोर सं. आंबा नदीचे कांठीं.

**पालीकोंडा** (श.) हिं. म. इ. अर्काटपा. २६ मैल.

**पालीठाणा** (श.) हि. मुं. इ. गुजराथेंत. येथें जैनांचीं देवाल्यें पाहण्यासारखीं आहेत.

**पालीलोर** (गां.) हि. म. इ. येथें बेली साहेबाचा हैदरअल्लीनें पराभव केला, सन १७८१.

**पालूर** (ग्रा.) हिं. म. इ. सिरमुर प्रां.

**पार्ले** (गां.) हिं. मुं. इ. कुलाबा जि. महाड ता. महाडपा. एक मैलावर. येथें कोरींव केणीं आहेत.

**पाल्क** (सामु.) हि. द. हिं. व सिलोन बेट ह्यांचे मध्ये.

**पावगड** (डों.) हि. मुं. इ. गुजराथ प्रां. पंचमहाल जि.

**पावनगड** (कि.) हिं. मुं. इ. कोल्हापूर सं.

**पावस** (गां.) हिं. मु. इ. रत्नागिरी जि. रत्नागिरी ता.

**पाव्हनसी** (ग्रा.) हिं. म. इ. तंजावर पर.

**पासको** (श.) अमे. खं. द. अमे. पेरू देशांत.

**पासारो** (भू.) यू. खं. इताली दे.

**पासिफीक** (महासा.) आशिया खं. पूर्वेस व अमेरिका खं. पश्चिमेस.

**पासिस** (न.) आशि. खं. ग्रान्सकाकेशियांतून निघून काळ्या समु. मिळते.

पाहाडी (गां.) हिं. मुं. इ. टाणें. जि. भिवंडी ता.
पाहारगड (श.) हि. सिंधाचे रा. ग्वालेरपा. २८ मैल.
पाहारपूर (श.) हि. पं. इ. सिंधूचे कांठीं. २ वाय. प्रां. फरक्काबाद प्रां. फत्तेगड पा. ७ मैल.
पाळधी (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. जामनेर ता. [ मैल.
पिओरा (गां.) हिं. वाय. प्रां. कमाऊन जि. अलमोरापा. ९
पिकलो (श.) हि. बं. इ. कटक प्रां. कटकपा. १८ मैल.
पिक्कापूर (श.) आशि. खं. इंग्लिशांचे ताब्यांत.
पिगा (श.) हिं. वाय. प्रां. मुरादाबाद जि.
पिर्चीचा (पर्व.) अमे. खं. द. अमे. इक्केदोर देशांत.
पिजा (श.) यू. खं. इतालींत. हे विद्यालयाकरितां प्र.
पिटमपूर (गां.) हि. वाय. प्रां. कानपूर प्रां. इटावापा. ५ मैल.
पिटवर्ग (श.) यू. खं. इंग्लंदांत तेन नदीवर
पिटलाद (श.) हि. मुं. इ. गुजराथ प्रां. गायकवाडाचे रा.
पिटोन (श.) हिं. म. इ. निजामचे रा. गोदावरीचे कांठीं.
पितरमारित्सबर्ग (श.) आफ्रि. खं. दक्षिणेस नानालची राज.
पित्सबर्ग (श.) अमे. खं. उ. अमे. युनैतेद्स्तेत्समध्यें. लोखंडाचे कारखान्याकरितां प्र.
पित्रा (श.) आशि. खं. आरबस्तान दे. हेजिजाद प्रां.
पित्रिआ (प्रां.) आशि. खं. आरबस्तान दे. यास सिलामय म्हण.
पिदमांत (प्रां.) यू. खं. इतालींत. [ शांचे ता.
पिनांग (बे.) आशि. खं. मयाला द्वीपकल्पाचे पश्चिमेस. इंग्लि-
पिम्रा (दगड)(श.) आशि. खं. आरबस्तानांत उजाड आहे. येथील घरें दगड कोरून केलेलीं आहेत.

**पिपचो** (श.) हिं. बं. इ. रामगड प्रां. रामगडापा. १९ मैल.

**पिपरवानी** (गां.) हिं. मध्य प्रां. शिवनी जि.

**पिपरा** (श.) हिं. वाय. प्रां. गोरखपूर प्रां.

**पिपरेंडा** (श.) हिं. वाय. प्रां. बांडा जि. बांडापा. १० मैल. येथें मोठा बाजार भरतो.

**पिपली** (गां.) हिं. वाय. प्रां. बिजनूर प्रां. मुरादाबादपा. ४४ [ मैल.

**पिपलीजालेश्वर** (गा.) हिं. बं. इ. सुवर्णरेखा नदीचे कांठीं.

**पियदमोंत** (शि.) यु. खं. इतालींत आल्प्स पर्वताचें शिखर.

**पिरकोण** (गां.) हिं. मुं. इ. टाणें जि. पनवेल ता.

**पिरगंज** (श.) हिं. बं. इ. रंगपूर प्रां. रंगपूरपा. २८ मैल. २ पुरणीयापा. ९ मैल. ३ दिनाजपूर प्रां. दिनाजपूरपा. २६ मैल.

**पिरनगर** (गां.) हिं. वाय. प्रां. औध प्रां. लखनौपा. १७ मैल-

**पिरनीज** (पर्व.) यु. खं. फ्रान्स व स्पेन यांचे हद्दीवर. २ आस्ट्रे-लिया बेटसमूहांत व्हिक्टोरिया बे. पर्व.

**पिरामिद** (इमा.) आफ्रि. खं. मिसर दे. फार उंच व फार मोठ्या प्राचीन काळच्या इमारती.

**पिरोफ** (न.) हिं. वऱ्हाड प्रां. एलिचपूर जि.

**पिलकोमायो** (न.) अमे. खं. बोलिवियांत. इचे कांठीं चुकीसाका.

**पिलदी** (श.) हिं. म. इ. अर्काट प्रां. मद्रासपा. ३८ मैल.

**पिलीबेट** (श.) हिं. वाय. प्रां. बरेली पर. येथील तांदुळ फार उत्तम. व्यापार मोठा चालतो.

**पिवादे** (अखा.) अमे. खं. मीनलांदचे उत्तरेस.

**पिशवी** (गां.) हि. मुं. इ. कोल्हापूर सं. पन्हाळे पेठ्यांत.
**पिस्का** (बे. उप.) अमे.खं.द. अमे. पेरू देशा. पश्चिमेस. [आहेत.
**पिसगांव** (गां.) हि. वऱ्हाडांत वणी जि. येथें कोळशाच्या खाणी
**पिसोरखांड** (गां.) हि. मुं. इ. नगर जि. श्रीगोंदें ता. येथे कोकजाईचे पर्वत आहेत. [ समु. मिळते.
**पिहो** (न.) आशि. खं. चिनांत खोई पर्व. निघून पूर्वेस पीत
**पीत** (समु.) आशि. खं. चीन देशाचे पूर्वेस.
**पुकोली** (श.) हि. बं. इ. मेमनसिंग प्रां.
**पुगड** (श.) हि. बं. इ. रामगड प्रां.
**पुचपोरा** (गां.) हिं. वाय. प्रां. मिनपुरी प्रां.
**पुचोरिया** (गां.) हि. वाय. प्रां. बरेली पर.
**पुणतांबें** (श.) हि. मुं. इ. नगर जि. कोपरगांव ता. गोदावरीचे कांठीं यात्रेचें ठिकाण. चांगदेवाची समाधि.
**पुणें** (श.) हि. मुं. इ. पुणे जि. मुळामुठा नदीचे कांठीं. हें मुं. इ. दुसरे प्रतीचें शहर. सर्व प्रकारच्या सुधारणांनीं नांवाजलेलें. गवरनर कांहीं दिवस येथें राहतात. नळाचे पाणी विपुल आहे. हवा उत्तम. वस्ती एक लाख. जवळ पर्वती म्हणून टेंकडी आहे. पेशव्यांचें मु. शहर होते. रेलवे-स्टेशन आहे. जवळ मुंढवें येथें कागदाची गिरणी, चतरसिंगी, गवरनरचा बंगला, पर्वती, फर्ग्युसन कालेज, जरतारीचा कारखाना वगैरे गोष्टी पाहाण्यासारख्या आहेत.
**पुतकोट** (सं. श.) हिं. म. इ. तंजावर प्रां.

**पुतपरगंज** (श.) हिं. वाय. प्रां. बुलंद शहरामध्यें. मोठा बाजार भरतो.

**पुतासहारेनास**(श.) अमे. खं. द. अमे. पातागोनियाची राज.

**पुतौरा** (गां.) हिं. वाय. प्रां. बांडा जि.

**पुतुमायो** (न.) अमे. खं. द. अमे. अमाझोनला मिळते.

**पुथ** (श.) हिं. वाय. प्रां. मिरत पर.

**पुथीया** (गां.) हिं. वाय. प्रां. मिनपुरी प्रां. [ पा. २१ मैल.

**पुथोना** (श.) हिं. वाय. प्रां. अलाहाबाद प्रां. अलाहाबादे-

**पुदुकोटा** (श. स.) हिं. म. इ. मदुरा जि. त्रिचनापल्लीच्या उत्तरेस.

**पुदोरा** (गां.) हिं. वाय. प्रां. अलिगड पर.

**पुनगर** (गां.) हिं. वाय. प्रां. बांडा जि. जबलपूर पा. २० मैल. २ बरेली पर.

**पुनवा** (गां.) हिं. वाय. प्रां. अलाहाबादपा. ३८ मैल.

**पुनाखा** (श.) हिं. भुतान देशांत.

**पुनासा** (श.) हिं. माळव्यांत ग्वाल्हेरचे (सिंद्याचे) राज्यांत.

**पुरगी** (श.) हिं. म. इ. निजामचे रा. हैदराबादपा. ४१ मैल.

**पुरणगड** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी. जि. रत्नागिरीपा. १२ मैल.

**पुरण्या** (श.) हिं. बं. इ. जि. येथे बिदरी काम चांगलें होतें.

**पुरनीपूर** (गां.) हिं. वाय. प्रां. अलाहाबाद पर.

**पुरबानी** (श.) हिं. म. इ. निजामचे रा.

**पुरसर** (श.) हिं. मुं. इ. गुजराथेंत राजकोटपा. ४१ मैल.

**पुरसा** (श.) हिं. बं. इ. दिनाजपूर प्रां. दिनाजपूरपा. ३९ मैल.

पुरा (श.) हिं. वाय. प्रां. कानपूर पर. मोठा बाजार भरतो.
पुराल्या (न.) आशि. खं. बलुचिस्तानांत लस प्रां. बेला शह- राजवळ. [ ऊळ आहे.
पुरी (श.) हिं. बं. इ. ओरिसा प्रां. येथें जगन्नाथाचें दे-
पुरूस (न.) अमे. खं. द. अमे. अमाझोनला मिळते.
पुरोक (गां.) हिं. वाय. प्रां. मिनपुरी पर. मिनपुरीपा. ८ मैल.
पुरोली (गां.) हिं. वाय.प्रां. फरकाबाद मां. फत्तेगडपा. ४४मैल.
पुर्गुकिवुले (पर्व.) आशि. खं. चिनई तार्तरींत.
पुर्णगड (गां. कि.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. रत्नागिरी ता.
पुर्णा (न.) हिं. वऱ्हाड प्रां. सातपुड्यांतून जाऊन तापीस मिळते.
पुरंदर (गां. कि.) हि. मुं. इ. पुणे जि. येथील हवा चांगली आहे. या तालुक्याचें ठाणें सासवड येथे आहे. तह; स. १७७६ त पेशवे व इंग्लिश.
पुलरा (गां.) हिं. वाय. प्रां. मुजफरनगर मां.
पुलवारी (श.) हिं. बं. इ. पाटणा प्रां. पाटणापा. ९ मैल.
पुलाडम (श.) हिं. म. इ. कोईमतूरपा. २१ मैल.
पुलार (न.) हिं. म. इ. म्हैसूर सं. निघून बंगालच्या उप- सा. मिळते.
पुलींद (दे.) आशि. खं. बलुचीस्तान देशाचें नांव.
पुलुमकोटा (श.) हिं. म. इ. तिनवेली मां. येथें फौजेची छा- वणी आहे.
पुलोपिनांग (श.) आशि. खं. द. मलाकाचे सामु. जवळ.
पुलोवो (श.) आशि. खं. द. मसाल्याचे बेटांत.

**पुष्कर** (श. सरो.) हिं. राजपु. अजिमगडाजवळ प्रसिद्ध क्षेत्र आहे.
**पुष्पावती** (न.) हिं. मुं. इ. पुणें जि. जुन्नर ता.
**पुसद** (श.) हिं. वऱ्हाडांत वासीम जि. तालुक्याचें ठिकाण.
**पुसलें** (गां.) हिं. वऱ्हाडांत उमरावती जि.
**पुसेगांव** (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. खटाव ता. [ स्थान.
**पुळें** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. रत्नागिरी ता. गणपतीचें
**पूर्व केप** (भू.) आशि. खं. रशियाचे उत्तरकेपाचें नांव.
**पुर्वेकडील घांट (पूर्व घांट)** (पर्व.) हिं. म. इ. कर्नाटकच्या उत्तरेकडील भागापा. उत्तरसरकार्सपर्यंत दक्षिणोत्तर पूर्वकिनाऱ्याकडील डोंगर.
**पूस** (न.) हिं. वऱ्हाडांत अजिंठ्याचे डोंगरांतून निघून पैनगगा नदीस मिळते.
**पेईहो** (न.) आशि. खं. चीन दे. इचे कांठीं पेकिन शहर.
**पेकिन** (श.) आशि. खं. चिन्नाची रा. पेईहो नदीचे कांठीं.
**पेक्यान** (न.) आशि. खं. चिनांत सिक्यांग नदीस कंतान शहराजवळ मिळते.
**पेगू** (श. प्रां. न.) हिं. ब्रह्मदे. याच नांवाच्या नदीच्या कांठीं श्रीमान् शहर. स. १८५३ त इंग्लिशांनीं घेतलें.
**पेचिनी** (प्रां.) आशि. खं. चीन देशांत. [ रंगून पा. ६२ मैल.
**पेचिली** (अखा.) आशि. खं. चिनई तार्तरीचे दक्षिणेस.
**पेचोरा** (न.) यु. खं. रशियांत आर्तिक महासा. मिळते.
**पेट** (न.) हिं. वऱ्हाडांत अकोला जि.
**पेटपूर** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. साबरमतीचे कांठीं अमदाबादपा. १५ मैल.

**पेटलाद** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. गायकवाडचे रा. ता.
**पेडगांव** (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. कर्जत ता. भीमा नदीचे कांठीं. येथे बाहादूरगड नांवाचा किल्ला आहे.
**पेडावा** (न.) हिं. मुं. इ. सातारा जि. कृष्णेस मिळणारी नदी.
**पेड्रो** (भू.) हिं. द. सिलोनच्या उत्तरेस
**पेण** (श.) हिं. मुं. इ. कुलाबा जि. तालुका आहे. येथें मिठाचें उत्पन्न पुष्कळ होतें.
**पेणगंगा** (न.) हि. वऱ्हाडांत अजिंठ्याचे डोंगरांत देऊळघांटाजवळ उत्पन्न होऊन वर्धा नदीस मिळते.
**पेत्रोपालोस्क** (श.) आशि. खं. रशियांत. कामश्चाटकामध्यें इशीम नदीचे कांठीं.
**पेथोरागड** (श.) हि. वाय. प्रां. कमाऊन प्रां. येथे मोठा बाजार भरतो. हे काळी नदीचे कांठीं.
**पेदेल** (गां.) यु. खं. इंग्लंद देशांत यार्कशायर प्रांतांत.
**पेद्रोतालागेला** (पर्व) हिं. द. सिलोनमध्ये.
**पेनाकोंडा** (श.) हिं. म. इ. बल्लारी प्रां.
**पेनेर** (न.) हिं. म. इ. म्हैसूर सं. कडलुराजवळ समुद्रास [मिळते.
**पेन्झन्स** (श.) यु. खं. इंग्लंद दे. कार्नवाल प्रां. दक्षिण किनाऱ्यावर.
**पेन्सिल व्हॅनिया** (प्रा.) अमे. ख. युनैतेदस्तेत्स प्रां. यांत फिलादेलफिया शहर आहे.
**पेपरघाट** (श.) हिं. बं. इ. सुलतानपूर प्रां.
**पेमगिरी** (डों.) हिं. मुं. इ. नगर जि. संगमनेर ता. पश्चिमेस.
**पेरगांव** (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. नगरपा. १९ मैल.

**पेरास** (श.) यू. खं. आर्किपेलेगोंत. येथ संगमरवरी दगड सांपडतात.

**पेरिकोप** (अखा.संयो.) यू. खं. रशिया आणि क्रिमिया यांमध्यें.

**पेरिपट्टण (पेरियापट्टण)** (श.) हिं. म. इ. म्हैसूर मां. येथें तीन देवालयें पाहण्यासारखीं आहेत.

**पेरी** (श.) हिं. वाय. मां. गोरखपूर मां.

**पेरू** (दे.) अमे. खं. द. अमेरिकेंत.

**पेरूज** (सामु.) आशि. खं. पूर्वेस साघलीन व मचमाय ह्यांचेमध्यें.

**पेरोत** (पर्व.) अमे. खं. मेक्सिको दे.

**पेलिंग** (पर्व.) आशि. खं. चिनांत.

**पेलू** (बे.) आशि. खं.द् पासि. महासाग. ओशियानियाच्या ईशान्येकडेस मैकोनेशियांत.

**पेलूर** (श.) हिं. म. इ. नेलोर मां.

**पेवें** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. चिपळूण ता.

**पेशन्स** (भू.) आशि. खं. पूर्वेस साघलीन बेटाच्या पूर्वेस.

**पेशावर** (श.) हिं. वायव्येस आफगाण लोकांची प्राचीन रा. लष्करची छावणी.

**पेस्त** (श.) यू. खं आस्त्रिया दे. हंगेरीची रा.

**पेसली** (श.) यू खं. स्कातलंदांत व्यापाराकरितां प्रसिद्ध.

**पेहरी** (गां. जा. इ.) हि. वाय. मां. बुंदेलखंडांत.

**पैगा** (श.) हिं. पं. इ. सिंधूपा. ११ मैल.

**पैठण** (श.) हि. मुं. इ. निजामाचे रा. गोदावरीचे कांठीं. हें शालिवाहनाचें रा.श. यास प्रतिष्ठान म्हणतात.

**पैनगंगा** (न.) पेणगंगा पहा.

**पैणघांट** (घां.) हि. म. इ. कानडा. प्रांतांत.

**पैंपौस** (सरो.) यू. खं. रशियांत.

**पो** (न.) यू. खं. इताली दे. आल्स व आपिनैन पर्व.निघून आद्रियातिक समु. मिळते.

**पोकर** (श.) हि. राजपु. अजमीर प्रां. या शहरासभोंवती वाळूचीं मैदानें आहेत. हें हिंदूंचें पवित्र स्थान आहे. आश्विनी पौर्णिमेस मोठी यात्रा भरते. लुनी व सरस्वती ह्या नद्या निघतात. येथील द्राक्षे मोठीं व गोड अशी प्रसिद्धि असून शिराज येथील द्राक्षांसारखीं उत्तम होतात. येथें मोटमोठाले बाग आहेत.

**पोकरी** (श.) हि. वाय. प्रां. बांडा पर. अजगड्या. २० मैल. २ कमाऊन प्रांतात. पर्वताच्या पायथ्याशीं. पर्वतावर देवदाराचीं झाडें फार आहेत. या गांवीं तांब्याच्या खाणी आहेत.

**पोखरण** (श.) हि. राजपु. जोधपूर प्रां. हें व्यापाराचें मोठें ठिकाण आहे.

**पोखरी** (घां.) हिं. मुं. इ. पुणें जि. आंबेगांव घोडे या गांवांजवळील डोंगरांत.

**पोगलापुडी** (श.) हि. म. इ. निजामचे रा. गोदावरीचे कांठीं.

**पोजन** (गां.) यू. खं. प्रशियांत वार्ता नदीचे कांठीं.

**पोती** (श.) आशि. खं. ट्रान्सकाकेशियांत मिंग्रेलिया प्रां. काळ्या समुद्राचे कांठीं पासिस नदीचे मुखाजवळ.

**पोतोमाक** (न.) अमे. खं. युनैतेद्स्तेत्समध्यें. हिचे कांठीं वाशिंग-
तन शहर.

**पोतोसी** (श.) अमे. खं. मेक्सिको दे. [खाणी आहेत.

**पोल्की** (गां.) हिं. वाय. प्रां. कमाऊन प्रां. येथें तांब्याच्या

**पोनपुढा** (श.) हिं. म. इ. मलबार प्रां. [नदीचे कांठीं.

**पोनानी ऊर्फ पन्यानी** (श.) हिं. म. इ. मलबार प्रां. पुनानी

**पोपोक्यातोपीतल** (ज्वा. मु.) अमे. खं. म. अमे. मेक्सिको दे.

**पोफरण** (गां.) हिं. मुं. इ. टाणें जि. माहिम ता.

**पोफळी** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. चिपळूण ता.

**पोयंजे** (गां.) हिं. मु. इ. ठाणे जि. पनवेल ता. [कांठीं

**पोरबंदर** (श. बं.) हिं. मुं. इ. गुजराथेंत काठेवाडांत. अरबी समुद्राचे

**पोर्ट वाताल** (बं. श.) आफ्रिका खं. पूर्व आफ्रिकेंत.

**पोर्ट विलो** (श.) यु. खं. स्कातलंदांत फ्रिथ आफ फोर्थजवळ.

**पोर्ट ब्लेअर** (गां.) हिं. ब्रह्म. दे. दक्षिणेस अंदमान बेटांत. येथें
इ. स. १८७२ त लार्ड मेयो ग. ज. मारिले गेले.

**पोर्टस् मौथ** (बं. श.) यु. खं. इंग्लंदांत हंट्स प्रां. हें आरमाराकरितां
प्रसिद्ध आहे.

**पोर्त आदेलेद** (श.) आशि. खं. द. पासि. महा. साग. आस्त्रालेशियांत
विक्टोरिया बेटांत.

**पोर्त आलग्रे** (श. बं.) अमे. खं. द. अमे. ब्राझिल दे.

**पोर्त निग्रो** (श. बं.) अमे. खं. द. अमे. ब्राझिल दे.

**पोर्तलांद** (श.) आशि. खं. द. पासि. महासाग. आस्त्रेलियांत
विक्टोरियांत. २ अमे. खं. युनैतेद्स्तेत्समध्यें.

**पोर्त सेंत** (श.) आफ्रि. खं. इजिप्त दे. सुवेझच्या कालव्याचे उत्तर द्वाराजवळ. २ हिं. म. इ.

**पोर्त सांताक्रुथ**(श.वं.) अमे. खं. पाटागोनियांत.

**पोर्तुगाल** (दे.) यू. खं. स्पेन दे. पश्चिमेस.

**पोर्तोनोवो** (श.) हि. म. इ. पोर्तसेंत देविदच्या द. येथें लोखंडाचा कारखाना चालतो. इं.व है. ल. १७८१. पोंदेशरीच्या द. ३२ मैल.

**पोर्तोवेलो**(ज्वा.प.) अमे. खं. मेक्सिको दे.

**पोलची** (श.) हिं. म. इ. कोईमतूर प्रां. कोईमतूरपा. २६ मैल.

**पोलंद** (प्रां.) यू. खं. रशिया, आस्त्रिया व प्रशिया ह्या तिघांनीं वाटून घेतला. ह्याचे राजधानीशहर वार्सा.

**पोलिकास्त्र**(अखा.) यू. खं. इतालीच्या नैर्ऋत्येस.

**पोलूर** (श.) हिं. म. इ. अर्काटपा. ११ मैल.

**पोलेनिशिया**(बे.समु.) आशि. खं. द. पासि. महा. साग. आस्त्रालिया बेटांपैकीं एक समूह.

**पोवनगड** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. बडोद्यापा. २२ मैल.

**पोशीतरू** (श.) हिं. मुं. इ. गुजराथेंत गायकवाडचे राज्यांत.

**पोश्री** (न.) हिं. मुं. इ. ठाणें जि. अरबी समुद्रास मिळते.

**पोहनी(पौनी)**(श.) हिं. मध्यप्रां. भंडारा जि. वैनगंगेच्या कांठीं रेशमी व सुती कापडाचा व्यापार.

**पोहोर** (न.) हिं. मुं. इ. पुणे जि. खेड ता.

**पौड** (गां.) हि. मुं. इ. पुणें जि. हवेली ता. मुळशी पेट्याचें मुख्य गांव.

**पौनार** (गां.) हिं. मध्यप्रां. वर्धा जि.

**पौनी** (गां.) हिं. मध्य प्रां. भंडारा जि. वैनगंगेच्या कांठीं.

**पंचगंगा** (न.) हिं. मुं. इ. सह्याद्रि प. निघून कोल्हापुरावरून जाऊन कृष्णेस मिळते.

**पंचतनबोर्लेई** (श.) हिं. मुं. इ. जंजिरा सं. तालुक्याचें ठिकाण.

**पंचनदी** (न.) हिं. पं. इ. रावी, चिनाब झेलम, सतलज, बियास ह्या मिळून झाली आहे. ही मिथन कोटाजवळ सिंधूस मिळते.
(गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. दापोली ता.

**पंचमनगर** (गां.) हिं. मध्य प्रां. दमोह जि. येथें कागद चांगला [होतो.

**पंचमहाल** (जि.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. जिल्हा.

**पंचवटी** (गां. क्षे.) हिं. मुं. इ. नाशिक जि. नाशिकाच्या पूर्वेस लागनच गंगेच्या कांठीं. येथें श्रीराम वनवासांत असतां राहिले होते. त्यांचें भव्य व मजबूत असें मंदीर आहे. हें मंदीर स. १७९० त बांधिलें. नाशिक शहराप्रमाणेंच या बाजूस गंगेस घांट, पटांगणें, देवालयें आहेत. व पंचवटींतून नाशिक येथें जाण्या येण्यास टिकठिकाणीं लहान लहान सांडवे असून भव्य पूल व पाण्याच्या संचयास्तव मोठा बंधारा बांधिला आहे. का. म. थत्ते. शिवाय सीतागुंफा, तपोवन हीं ठिकाणें आहेत. गोदेस स. १८७२ त सिंहस्थपर्वणीचे दिवशीं महापूर येऊन पुष्कळ बैरागी वाहून गेले.

**पंचाळें** (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. सिन्नर ता.

**पंजाब** (प्रां.) हि. वाय. प्रां. वायव्य कोनास, पांच नद्या ज्या प्रदेशांतून वाहतात तो. सिंधप्रांताचे उत्तरेस.

**पंढरपूर** (श. क्षे.) हि. मुं. इ. सोलापूर जि. ता. भीमा नदीचे कांठीं येथे श्रीविठ्ठलमंदीर असून आषाढी व कार्तिकी ह्या एकादशींस मोठी यात्रा भरते.

**पंढाना** (प्रां.) हि. मध्यप्रां. नेमाड जि. भीमानदीचे कांठीं.

**पंदरान** (भू.) आशि. खं. पूर्वेकडील द्वीपकल्पाचे पूर्वेस.

**पांगरी** (गां.) हि. मुं. इ. सोलापूर जि. बार्शी ता.

**पांचाळ** (गां.) हि. मु. इ. खानदेश जि. पाचोऱ्याचे पूर्वीचे गांव.

**पांझर-रा** (न.) हि. मुं इ. खानदेश जि. निघून धुळ्यावरून जाऊन तापीस मिळते. हीस १८७२ त मोठा पूर येऊन धुळे गांवची अर्धी पेठ वाहून गेली [होती.

**पांडवगड** (गां. कि.) हिं. मुं. इ. सातारा जि. वाई ता.

**पांढुरना** (गां.) हिं. मध्यप्रां. नागपूर जि.

**पांडेवाडी** (गां.) हिं मुं. इ. सातारा जि. वाई ता. येथें वामन पंडित प्रसिद्ध कवी ह्यांची समाधी आहे.

**पांड्य** (देश.) हि. म. इ. अरकाट आहे तो देश. [गांव.

**पांढरकवडा** (गां.) हिं. वऱ्हाडांत वणी जि. वेताळपूर ता. चे मुख्य

**पांढरीनैल** (न.) हिं. आफ्रि. खं. व्हिक्टोरिया नायँझा सरोवरांतून अलबर्टनायँझ्यांतून न्यूबिया प्रांतांतून मिसर देशाचे उत्तरेस भूमध्यसमु. मिळते.

**पांढुरणें** (श.) हि. मध्यप्रां. छिंदवाडा जि. येथें कापूस होतो.

**पांदुरी** (श.) हिं. मध्यप्रां. हैदराबाद जि. इलिचपूरपा.

**पांढरली** (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. सिन्नर ता. [२१ मैल.

**पांदेतन** (गां.) हिं. काश्मिर दे. श्रीनगरपा. ४ मैल. येथें तळ्यांत देवालय आहे, तें पाहण्यासारखें आहे.

**पांदेचरी** (श.) हिं. म. इ. मद्रासचे द. फ्रेंच लोकांचे ताब्यांत.

**पांध्री** (गां. श.) हिं. मुं इ. सोलापूर जि. २ वाय. प्रां. वैतूल-पा. ३७ मैल.

**पांपूर** (श.) हिं. काश्मीरमध्ये झेलमनदीचे कांठीं. येथें पुष्कळ बाग व पुष्कळ कमानींचा पूल आहे व दोन मोठाल्या मशिदी आहेत. [नाडांत.

**पांप्लेना** (श.) यू. खं. स्पेन दे. २ अमे. खं. द. अमे. न्युग्रा-

**पांबेन** (सामु.) हिं. द. हिंदुस्तान व रामेश्वरबेट ह्यांमध्यें.

**पिंपळगांव** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. पाचोरे ता.

**पिंपळगांव काळ्यांचें** (गां.) हिं. वऱ्हाड प्रा. अकोला जि.

**पिंपळगांव जलाल** (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. येवले ता.

**पिंपळगांव बसवंत** (गां.) हिं. मुं. इ. नाशिक जि. निफाड ता.

**पिंपळगांव बुद्रुक** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश. जि. भुसावळ ता.

**पिंपळगांवराजा** (गां.) हिं वऱ्हाडांत बुलढाण जि. पाणनदीचे कांठीं.

**पिंपळनेर** (श.) हिं. मुं. इ. खानदेश. जि. तालुक्याचे गांव. पांझरा नदीचे कांठीं. [कांठीं.

**पिंपळवंडी** (गां.) हिं. मुं. इ. पुणें जि. जुन्नर ता. कुकडी नदीचे

**पिंप्राळें** (गां.) हि. मुं. इ. खानदेश जि. जळगांव ता.

**पिंप्री** (गां.) हि. मुं. इ. नाशिक जि. नाशिक ता.

**पिंग** (श.) हिं. ब्रम्हदे. इरावतीपा. १९ मैल. [आहे.

**पिंजर** (गां.) हिं. वऱ्हाडांत अकोला जि. येथें हेमाडपंती देऊळ

**पिंदुस** (पर्व.) आशि. खं. तुर्कस्तानांत.

पेंडुर (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी. जि. मालवण ता.
पेंठ (श.) हिं. मुं. इ. नाशिक जि. तालुक्याचे गांव हे पूर्वी मुसलमानी स. होते. येथील हवा पाणी वाईट [आहे.
पेंबा (बे.) आशि. खं. हिंदीमहासागरांत.
पेंब्रोक (प्रां. श.) यू. खं. इंग्लंदांत वेल्समध्ये.
प्रुथ (न.) यू. खं. रोमेनियामध्ये दान्यूब नदीला मिळते.
प्याकटना (श.) हि. वाय. प्रां. कमाऊन जि. अलमोदापा.
प्याकबर (गा.) हि. वाय. प्रां. मुरादाबाद जि. [१९ मैल.
प्युएर्तोरिको (बे) अमे. ख. मध्य अमेरिकेच्या लगत्याची बेटे, प्रेतर अंतिलीस वगैरे आहेत त्यांत हें आहे. [कांठीं.
प्रकाशे (श.) हि. मु. इ. खानदेश जि. शहादे ता. तापीच्या-
प्रचितगड (कि.) हिं. मु. इ. रत्नागिरी जि. संगमेश्वर ता. २ सातारा जि. पाटण ता.
प्रचंडगड (कि.) हिं. मुं. इ. पुणे जि. भोर सं.
प्रतापगड (कि.) हिं. मुं. इ. सातारा जि. जावली ता. २ अयोध्या प्रां. जि. ३ राजपुतान्यांत सं. वन्सवाड्याचे उत्तरेस.
प्रतापपूर (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. पिंपळनेर ता.
प्रभानवल्ली (गां.) हि. मु. इ. रत्नागिरी जि. राजापूर ता.
प्रभासपट्टण (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. जुनागड सं. येथें स. १८९१ त ताबुताच्या वेळीं हिंदु मुसलमानांत मोठा दंगा झाला.
प्रयाग (श.क्षे.) हिं. बं. इ. गंगा यमुना यांच्या संगमावर.
प्रवरा (न.) हिं. मुं. इ. नगर जि. रतनगडाजवळून निघून

टोंक शहरावरून जाऊन गोदावरीस मिळते. इचें पाणी फार हलकें आहे.

**प्रवरासंगम** (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. नेवासें ता. प्रवरा व गोदा यांच्या संगमावर आहे.

**प्रशिया** (दे.) यू. खं. जर्मनीदेशाचा एक भाग.

**प्राग** (श.) यू. खं. इतालींत बोहिमिया प्रां. राज.

**प्राणहिता** (न.) हिं. मध्यप्रां. वर्धा व वैनगंगा मिळोन झालेली नौ. ही गोदेस मिळते. कांठीं शहर शिरोंच्या. [शहर.

**प्रितोरिया** (श.) आफ्रि. खं. दक्षिण आफ्रिकेंत त्रान्सवालरिपचें

**प्रिन्स ऑफ वेल्स** (बे.) अमे. खं उत्तर अमे. आर्तिक महासागरांत.

**प्रिन्सेस एदवर्द हेलंद** (प्रां.) अमे. खं. उ. अमे. कानडाचे राज्यांत.

**प्रिपेत** (न.) यू. खं. रशियांत निपर नदीस मिळणारी नदी.

**प्रियामन** (श.) आशि. खं. पूर्वेस पासि. महासा. मसाल्याचे [बेटांत.

**प्रेसबर्ग** (श.) यू. खं. आस्त्रिया दे.

**प्रेमगिरी** (गां.) हिं. बं. इ.

**प्रेस्टन** (श.) यू. खं. इंग्लंदांत लँकेशायरमध्यें रिबन नदीचे कांठीं. येथें बांगड्या करण्याच्या भट्टया आहेत.

**प्रोम** (श.) हिं. ब्रम्हदे. इरावतीचे कांठीं.

**प्रोमहेन** (प्रां.) हिं. ब्रम्हदे. पेगू प्रांताचा भाग.

**प्रांतीज** (श.) हिं. मुं. इ. गुजराथेंत अमदाबाद जि. तालुका.

**प्लामनरोहेद** (भू.) यू. खं. इंग्लंदांत.

**प्लिनलिमन** (पर्व.) यू. खं. इंग्लंदांत वेल्समध्ये. [प्रसिद्ध आहे.

**प्लिमौथ** (श.बं.) यू. खं. इंग्लंदांत डेव्हन प्रां. आरमाराकरितां

**प्लासी** (श.) हिं. बं. इ. भागीरथी नदीचे कांठीं. येथें ल. इ.

स. १७५७ क्लैव व सुजाउद्दवला. कलकत्यापा. ९६ मैल.

फ.

**फतुआफत्रा** (श.) हिं. बं. इ. पाटणा जि. पुनपुन व भागीरथी ह्या नद्यांचे संगमावर हें पवित्र स्थान आहे. पाटणापा. १० मैल.

**फतेखेलडे** (गां.) हि. वऱ्हाड. प्रां. बुलढाणा जि. पाईनगंगेस मिळणाऱ्या भोगावती नदीचे कांठीं.

**फत्तेगड** (श.) हि. वाय. प्रां. गंगेच्या कांठीं.

**फत्तेपुरशिक्री** (श.) हि. वाय. प्रां. जि. आग्र्याजवळ. येथें बाबर व संग ह्यांची इ. स. १५२७ त व बंडवाले व इं. ह्यांची स. १८५७ त लढाई. दगडावर कोरींव काम उत्तम करितात.

**फनसे** (गां.) हि. मुं. इ. ठाणें जि. डाहाणू ता.

**फरुकाबाद** (श.) हि. वाय. प्रा. गंगेच्या कांठीं जि. स. १८०५ त होळकर व इंग्लिश ह्याची लढाई.

**फरगाण** (प्रां.) आशि. ख. तार्तरी देशांत.

**फरन्यान्देपो** (श.) आफ्रि. खं. सेनिगाल नदीचे कांठीं.

**फरा** (श.) आशि. खं. अफगाणिस्तानांत.

**फरिदकोट** (श.सं.) हिं. पं. इ. शीख लोकांचें. [सं. श.

**फरिदपूर** (गां.सं.श.) हि. ब. इ. ब्रह्मपुत्रेच्या कांठीं जि. २ पं. इ.

**फरिस्तान** (प्रां.) आशि.खं.इराणांत या प्रांतांत शिराज शहर आहे.

**फलटण** (श.) हिं. मुं. इ. सातारा जि. निंबाळकरांचें जहागिरीचें गांव बाणगंगेचे कांठीं.

फाकलंद (बे.) अमे. खं. द. अमे. पाटागोनियाचे दक्षिणेस.
फाची (श.) हि. राजपुताम्यांत जयपूर सं. येथें मोठा बाजार भरतो.
फापामो (गां.) हि. वाय. प्रां. अलाहाबाद जि. गंगेच्या कांठीं.
फाबल (न.उपसा.) यू. खं. अयर्लंडांत.
फारिया (न.) यू. खं. स्विदनांत बालतिक समु. मिळते.
फार्तक (भू.) आशि. खं. अरबस्तानच्या दक्षिणेस.
फार्तयार्क (श.) अमे. खं. कानडा दे.
फाल्कर्क (श.) यू. खं. स्कातलंडांत.
फालमौथ (श.) यू. खं. कार्नवाल प्रा. दक्षिण किनाऱ्यावरील.
फाल्सबे (उपसा.) आफ्रि. खं. द. आफ्रिकेत.
फिजी (बे.) आशि. खं. पूर्वेस पासि. महासा. आस्त्रेलिशियांत.
फिनलंद (अध्या.) यू. खं. रशियांत लापुंदाच्या पश्चिमेस बालतिक
फिना (गां.) हि. वाय. प्रां. बिजनूर प्रा. [समुद्राचे कांठीं.
फिनिस्तर (भू.) यू. खं. स्पेनदेशाचे वायव्येस.
फिरिया (श.) हि. नेपाळांत काटमांडूपा. ३७ मैल.
फिरोजपूर (श.) हि. पं. इ. घारानदीचे कांठीं जि. लाहोर पा. ४० मैल. शीख व इं. ल. १८४५.
फिरोजाबाद (श.) हि. पं. इ. येथे शीख व इंग्लिश ह्यांची लढाई झाली. [वेनिया प्रां-
फिलादेलफिआ (श.) अमे. खं.उ. अमे. युनैतेदस्तेत्समध्यें पेन्सल.
फिलिक्स (बे.) द. अमे. चिलीच्या पश्चिमेस.
फिलीपेन (बे.) आशि. खं. हिंदी महासाग. याची रा. मानिला.
फुचू (बं.) आशि. खं. चीन देशांत. [स्पेनच्या ताब्यांत.

**फुचूफू** (श.) आशि. खं. चीन दे. फोकेन प्रां.

**फुणगुस** (बं.) हि. मुं. इ. रत्नागिरी जि. संगमेश्वर ता.

**फुनेन** (बे.) यू. खं. देन्मार्क दे.

**फुलगड** (श.सं.) हिं. ब. इ.

**फुलतांब** (श.) पुणतांबे पहा.

**फुलपूर** (श.) हि. वाय. प्रां. अलाहाबाद प्रां. येथें मोठा बाजार भरतो.

**फुलमरी** (श.) हिं. म. इ. निजामचे रा. औरंगाबाद जि.

**फुलवारी** (श.) हि. बं. इ. पाटणापा. ९ मैल.

**फेअरहेद** (भू.) यू. खं. अयर्लंदांत.

**फेजान** (दे.प्रां.) आफ्रि. खं. बार्बरी सं. दक्षिणेस हा सुपीक प्रदेश आहे.

**फेनपूर** (श.) हि. मुं. इ. खानदेश. जि. जामनेर ता.

**फेरनांदेज** (श.बे.) अमे. खं. द. अमे. चिल्लीच्या पश्चिमेस.

**फेराआईल्स** (बे.) यू. खं. स्कानलंदच्या उत्तरेस.

**फेरोजपूर** (श.) फिरोजपूर पहा.

**फेरोजशाहा** (काल.) हिं. प. इ. हरियाना प्रांतांतून यमुनेचा कालवा बिकानेरपर्यंत नेला आहे त्याचे नांव.

**फेरोजशाहा** (श.) हिं. अयोध्या प्रां. सितापूर जि. याचे पूर्वींचें नांव तारापूर. येथे तोडरमल्ल जन्मला. व १५८९ त मृत्यु पावला. हा क्षत्री जातीचा होता.

**फैजपूर** (श.) हि. मुं. इ. खानदेश जि. सावदे ता. येथें रंगीत पासोडे चांगले होतात.

**फैजाबाद** (श.) हिं. वाय. प्रां. अयोध्या प्रां. जि.

**फैटापूर** (गां.) हिं. मुं. इ. गुजराथेंत गायकवाडचे राज्यांत.

**फॅल** (श.) यू. खं. अयर्लंदांत याच नांवाचा उपसागर आहे. तेथेंच नदी आहे.

**फोकेन** (प्रां.) आशि. खं. चिनांत. यांत फुचुफू हें मुख्य शहर [आहे.

**फोरमेनतारा** (बे.) यू. खं. स्पेन देशांत.

**फोर्त** (न.) यु. खं. स्कातलंदांत.

**फोर्त सेंतदेवीद** (श.कि.) हिं. म. इ. द. पन्यार नदीचे कांठीं.

**फोर्तु** (अखा.) यू. खं. स्कातलंदांत.

**फोर्थ** (न.) फोर्त पहा.

**फोर्मोसा** (बे.) आशि. खं. चीनच्या पूर्वेस फोर्मोसा व चीन यांचे मध्ये याच नांवाची सामुद्रधुनी.

**फोलंग** (श.) हि. भूतान सं.

**फौलंद(न्युफौलंद)** (बे.) अमे. खं. कानडाचे राज्याचे पूर्वेस.

**फंदी** (उपसा.) अमे. खं. कानडाचे रा. पूर्वेस न्यूब्रन्सविक व नोवास्कोशिया यांच्यामध्ये.

**फंचीरा** (पर्व.) आफ्रि. ख. अबिसीनियांत. [पोलिनीशियांत.

**फेंदली** (बे.) आशि. खं. द. पासि. महासा. ओशियानियामध्यें

**फोंडें** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. देवगड ता. याच [नांवाचा घाट.

**फ्रानेनबर्ग** (श.) यू. खं. प्रशिया दे.

**फ्रान्स** (दे.) यू. खं. देश आहे. [पूर्वेस.

**फ्रिओ** (भू.) आफ्रि. खं. दक्षिणेस. २ द. अमे. ब्राझिलच्या

**फ्री तौन** (श.) आफ्रि. खं. सिएरालीओनची राज.

**फ्रिथफोर्थ** (समु.) यू. ख. स्कातलंदांत.

**फ्रिबुर्ग** (श.) यू. खं. स्वित्सर्लंदमध्यें.

**फ्रेदरिक तौन**(श.) अमे. खं. न्यूब्रन्सविक प्रांतांत.

फ्रेद्राल (सरो.) अमे. खं. स्वतंत्र संस्थानांत.
फ्रोरो (फ्रेर्यु) (बे.) यू. खं. देनमार्क दे.
फ्रोवार्द (भू.) अमे. खं. दक्षिणेस. [राजाचे पुतळे आहेत.
फ्रांकफुर्त (श.) यू. खं. जर्मनीत मेन नदीचे कांठीं येथें प्राचीन
फ्रेंजर (न.) अमे. खं. जुआनदीफुकाचे सामु. मिळते.
फ्रातरी (न.) अमे. खं. युनैतेद्स्तेत्समध्यें.
फ्रारिदा (द्वीप.स.) अमे. खं. युनैतेदस्तेत्समध्यें.
फ्रारेन्स (श.) यू. खं. इतालीत आर्नोनदीचे कांठीं. येथे कोल्हापुरचे राजाराम राजे स. १८७०त मरण पावले. येथील चित्रकाम व खोदीव काम पाहण्यासारखें
फ्रिट (प्रां.श.) यू. खं. इंग्लंदमध्ये. वेल्स प्रा. [आहे.

## ब.

बक्कर (श.) हि. मुं. इ. सिंध प्रां. सिंधुनदाचे कांठीं.
बकसार (श.) हि. ब. इ. बहार प्रां येथें मिर कासिम व इंग्लिश ह्यांची स. १७६४ त लढाई.
बक्तेगान (सरो.) आशि. खं. इराण देशांत.
बगदाद (श.) आशि. खं. तुर्कस्तान दे. तैग्रीस नदीचे दोन्ही थडींस वसलेलें आहे. हे कालिफाचें राजधानी
बचाऊ (श.) हि. मुं. इ. कच्छ प्रां. [शहर होतें.
बटवा (न.) हिं. वाय. प्रां. बुंदेलखंडांत यमुना नदीस मिळते.
बटेविआ (श.) हि. द. हिंदी महासा. जावाबेटांत. [मैल. रे.स्टे.
बडनेर (गां.) हि. वऱ्हाडांत उमरावती जि. उमरावतीचा. ५
बडवाई (गां.) हि. मध्य प्रां. नर्मदेच्या कांठीं उत्तर बाजूस. येथून ओंकारेश्वर ६ मैल.

**बडोदें** (श.) हिं. मुं. इ. गायकवाडच्या राज्याची राज. विश्वामित्रीच्या कांठीं. येथें मोठमोठ्या इमारती पाहण्यासारख्या आहेत रे. स्टे.

**बत्तिसशिराळें** (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. वाळवें ता.

**बदकशान** (प्रां.) आशि. खं. नार्तरीत.

**बदनूर** (गां.) हि. मध्य प्रां. बैतूल जि.

**बदरीकेदार** (गां.) हिं. वाय. प्रां. हिमालयपर्वतांत शंकराचें स्थान.

**बदरीनाथ** (शिख.) हि. हिमालयपर्वताचे, उंची फूट २३४४१.

**बदलापूर** (गां.) हिं. मुं. इ. ठाणें जि. कल्याण ता.

**बदामी** (श.) हिं. मुं. इ. विजापूर जि. तालुका येथें भुईकोट [किल्ला आहे.

**बनकुरा** (श.) हिं. बं. इ. जि.

**बनखडी** (श.) हिं. मध्य प्रां. हुसंगाबाद जि. पंचमढीस जाण्याचें हे रे. स्टे. आहे. [बालाघाट जि.

**बनपूर** (श.) आशि. खं. बलूचिस्थानांत. २ हिं. मध्य प्रां.

**बनवासी** (गां.) हिं. मुं. इ. उत्तर कानड्यांत.

**बनारस (काशी)** (श.क्षे.) हिं. वाय. प्रां. भागीरथीचे कांठीं. हिंदूंचे पवित्र स्थान. येथें भागीरथीस मोटमोठे घाट बांधिलेले आहेत. हें सर्व शास्त्रांचे मूळपीठ आहे. येथील रस्ते फार अरुंद आहेत.

**बनास** (न.) हिं. भूतान दे. निघून ब्रह्मपुत्रा नदीस मिळते. २ राजपु. अरवली प. निघून चंबळा नदीस मिळते.

**बनासा** (श.) हिं. वाय. प्रां. गुरवळ प. यमुना नदीवर.

**बन्नु** (श.) हि. पं. इ. जि.

**बन्सवाडा** (श.सं.) हि. राजपु. डोंगपुरच्या दक्षिणेस.

बमनी (गां.) हिं. मध्य. प्रां. मंडला जि.

बरक (न.) हिं. ब्रह्मपुत्रा नदीस मिळते.

बरगड (श.) हिं. मध्यप्रां. संबळपूर जि. ता.

बरगेन (बर्जेन) (श.बं.) यू. खं. नार्वे देशांत पश्चिमेस.

बरड (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. फलटण जहागिरींत.

बरद्वान (श.सं.) हि. बं. इ. जि. येथें कोळशाच्या खाणी आहेत. दामोदर नदीचे कांठीं. [दक्षिणेस.

बरवानी (श.सं.) हि. मुं. इ. गुजराथेंत. २ मध्य हिं. नर्मदेच्या

बरहामपूर (श.) हि. म. इ. उत्तर सर्कार्स प्रां. येथें फौजेची छावणी आहे.

बराकपूर (श.) हि. बं. इ. कलकत्त्याच्या उत्तरेस १६ मैल. लष्कराची छावणी. स. १८५७ त बंड.

बराहत (श.) हिं. वाय. प्रां. गरवाल जि.

बरेच (प्रां.) हिं. वाय. प्रां. अयोध्येचा एक भाग.

बरेला (गां.) हिं. मध्यप्रां. जबलपूर जि.

बरेली (श.) हिं. वाय. प्रां. रोहिलखंडांत. जि. येथें सतार, विणा ह्यांस लागणाऱ्या तारा तयार करितात.

बऱ्हाणपूर (श.) हिं. मध्यप्रां. नेमाड ता. तापीचे कांठीं. येथें लुगडीं, कलाबतूचें काम, अमरी तंबाखु, गुडाखु उत्तम होतो. [१८५७ बंड.

बऱ्हामपूर (श.) हिं. बं. इ. जि. कलकत्त्यापा. ५८ कोस. स.

बर्कनहेड (श.) यू. खं. इंग्लंदांत चेशायर प्रां. मर्सी नदीवर.

बर्क्री (गां.) यू. खं. इंग्लंदांत.

बर्दाव (श.) हिं. बं. इ. जि.

**बर्नेट** (न.) आशि. खं. पू. पासि. महासा. आस्ट्रेलियांत मरे नदीला मिळते.

**बर्ने** (श.) यू. खं. स्वित्सर्लंदची राज. आर नदीचे कांठीं.

**बर्फांते वेंतूर** (अखा.) आफ्रि. खं. बार्बेरी सं. चे उत्तरेस.

**बर्मिंगहाम** (श.) यू. खं. इंग्लंदांत. येथें लोखंडी व पोलादी सामान तयार होतें.

**बर्म्युदा** (बे.) अमे. खं. युनैतेदस्तेत्सच्या पूर्वेस; हीं बेटें सुमारें [तीनशें आहेत.

**बर्लिन** (श.) यू. खं. जर्मनींत प्रशियाची रा. स्प्री नदीचे कांठीं.

**बर्विक** (श.) यू. खं. इंग्लंदांत त्वीद नदीचे कांठीं.

**बल्क** (श.) आशि. खं. अफगाणिस्तानचे उत्तरेस बुखारा प्रां.

**बलगेरिया** (प्रां.) यू. खं. तुर्कस्तान दे.

**बल** (सरो.) हि. काश्मिर सं.

**बळवडी** (गां.) हिं. मुं. इ. सोलापूर जि. सांगोले ता. माण न- [दीचे कांठीं.

**बलसाड** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. सुरत जि. तालुक्याचें ठिकाण.

**बलसोर (बलेश्वर)** (श.) हि. बं. इ. ओड्या प्रां. कटक जि. उत्तरेस. याच नांवाची खाडी.

**बलक** (श.) आशि. खं. अफगाणिस्तानांत.

**बलालपूर** (श.) हि. मध्यप्रां. चांदा जि.

**बळारी** (श.) हिं. म. इ. जि. कर्नाटक प्रां. डोंगरी किल्ला लष्करची छावणी, कापसाचा व्यापार.

**बलूचिस्तान** (दे.) आशि. खं. हिंदुस्थानच्या पश्चिमेस मुसलमान लोकांचा देश.

**बलेश्वर** (श.खाडी.) हिं. बं. इ. ओढीसा प्रां. बलेश्वराजवळ.

**बल्हेरी** (गां.) हिं. मध्य प्रां. जबलपूर जि. येथे विड्याची [पानें होतात.
**बवेरीया** (सं.) यू. खं. जर्मनींत.
**बसणी** (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. रत्नागिरी ता.
**बसरा** (श.) आशि. खं. तुर्कस्तानांत युफ्रातीस नदीचे कांठीं.
**बस्तार** (सं.) हिं. मध्य प्रां. चांदा जि. छत्तिसगडाचे दक्षिणेस डोंगराळ प्रदेश.
**बस्ती** (श.) हिं. वाय. प्रां. काशीच्या उत्तरेकडील मैदानांत.
**बहरअलतबारा** (श.) आशि. खं. तुर्कस्तानांत सिरिया प्रां. यांतून जार्दन नदी वाहते.
**बहरअलतहुन**(श.) आशि. खं. तुर्कस्तानांत सिरिया प्रां. यांतून जार्दन नदी वाहते.
**बाहदरपूर** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. अमळनेर ता.
**बाहादूरगड** (सं.श.) हिं. वाय. प्रां.
**बाहार (मगद)** (प्रां.श.) हिं. बं. इ. उत्तरेकडील प्रांत.
**बाहाळ** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. चाळीसगांव ता.
**बहियर** (श.) हिं. मध्यप्रां. बालाघाट जि. ता.
**बहुलें** (गां.) हिं. मु. इ. सातारा. जि. पाटण ता.
**बळसाणे** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश. जि. पिंपळनेर ता.
**बाइन ऑफ बेनीन** (उप.) आफ्रि. खं. वरच्या गिनींत.
**बाइन** (न.) यू. खं. अयर्लंडांत.
**बाक** (श.) अमे. खं. उ. अमे. स्वतंत्र. सं.
**बाकरगंज** (प्रां.) हिं. बं. इ. जि. जबलपूर व टोका यांचे उत्तरेकडील प्रांत. येथें तांदुळांचा व्यापार फार मोठा [चालतो.
**बाकीपूर** (श.) हिं. बं. इ. बहार प्रां.

बाकू (श.) आशि. खं. रशियांत ग्रास्काकेशियांत कास्पि-
यन समुद्राचे कांठीं येथें जळते झरे आहेत.
बाग (गां.) हि. मुं. इ. घोरघाटांत कोरींव लेण्याकरितां प्रसिद्ध.
बागतैस (न.) यू. खं. दान्यूब नदीला मिळणारी नदी.
बागमनी (न.) हि. वाय. प्रां. भागीरथीस मिळणारी नदी.
बागलकोट (श.) हिं. मुं. इ. कलादगी जि. तालुक्याचें ठिकाण.
बागलघाट (घा.) हिं. मुं. इ. बागलकोटाजवळ.
बागलाण (प्रा.) हि. मु. इ. नाशिक जि. तालुक्याचे मुख्य टाणें.
बागेवाडी (श.) हि. मुं इ. कलादगी जि. तालुका.
बाणकोट (श.बं.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. दापोली ता. बंदर,
येथेंच या नांवाची खाडी.
बाणगंगा (न.) हि. मुं. इ. नाशिक जि. निफाड ता. २ सातारा
जि. फलटण जहागिरींत निरेस मिळते.
बातेनबर्ग (श.) यू. खं. जर्मनींत.
बाथ (श.) यू. खं. इंग्लंडांत समरसेट प्रां.
बाथनिया (अज्ञा.) यू. खं. रशियाचे पश्चिमेस.
बाथर्स्त (श.) आशि. खं. द. पासि. महासागरांत आस्ट्रेलियांत.
येथे सोन्याच्या खाणी आहेत.
बादन (प्रा.) यू. ख. जर्मनीत. [पुरापा. ७ मैल.
बादशहानगर (श.) हि. वाय. प्रां. बादशहानगर प्रां. शहा जहान-
बान (न.) हिं. वाय. प्रां. यमुना नदीस मिळणारी. २ यू. खं.
बाबई (गां.) हि. मध्यप्रां. हुसंगाबाद जि. [अयर्लंदांत नदी.
बाबदेव (घा.) हिं. मुं. इ. पुणें जि. हवेली ता. हद्दीवर. २
खेडाळे घाटांसही म्हणतात.

**बाबीलन** (श.) आशि. खं. तुर्कस्तानांत. येथें शिकंदर बादशाहा इ. स. ३२३ वे वर्षी मरण पावला.

**बाबुबंद** (गां.) हिं. मध्यप्रां. नागपूरपा. ११ मैल.

**बाबेलमांडेब** (सामु.) आशि. ख. पश्चिमेस तांबडा समुद्र व हिंदी महासागर ह्यांच्या मध्यें.

**बाभळी** (गां.) हिं. वऱ्हाडांत एलिचपूर जि.

**बाभूळगांव** (गां.) हिं. मुं. इ. नगर जि. २ वऱ्हाड प्रां. वणी जि. येथें बैलांचा मोटा बाजार भरतो.

**बामरा** (सं.श.) हिं. मध्यप्रां. संबळपूर जि.

**बामीयान** (श.) आशि. खं. स्वतंत्र तार्तरींत.

**बाह्मणवेल** (गां.) हिं. मुं. इ. खानदेश. जि. पिंपळनेर ता.

**बायड** (श.) हिं. गुजराथ प्रां. महीकाठा एजन्सींत ईदरचें सं.

**बायडा** (न.) हिं. मु. इ. गुजराथ प्रां. अमदाबाद जि.

**बायरी** (डों.) हिं. मध्यप्रां. नरसिंगपूर जि. विंध्याद्रीचा फांटा.

**बायोन्ना** (बं.श.) यू. खं. फ्रान्सांत.

**बारडोई** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. सुरत जि. तालुका.

**बारडोली** (श.) हिं. मुं. इ. गुजराथ प्रां. सुरत जि. तालुका.

**बारन** (बे.) हिं. ब्रह्मदेशालगत.

**बारनल** (श.) आशि. खं. रशियांत.

**बारबेदोज** (बे.) आशि. खं. द. पासि. महा. सा. लेसर अँतिलीस बेटसमूहांत. इंग्लिशांचे ताब्यांत.

**बारफ्लूर** (भू.) यू. खं. फ्रान्सांत.

**बारसिलोर** (श.) हिं. म. इ. मलबार किना. हें शिवाजीनें इ. स. १६६७ त लुटलें होतें.

**बाराबंकी** (श.) हि. अयोध्या प्रां जि.

**बारामती** (श.) हि. मु. इ. पुणे जि. भिमथडी ता. कऱ्हाडीचे काठीं. प्रसिद्ध कवी मोरोपंत व श्रीधरस्वामी हे ह्या ठिकाणी होऊन गेले. रेशिमकाठी धोतरजोडे [चांगले होतात.

**बारामुळा** (श.) हि. काश्मिरांत.

**बारासजुन** (श.) आशि. खं. इराणांत बुशायरपा. ४६ मै. ई. व इराणी लोक. ल. १८५७ त.

**बारासेत** (प्रा) हि. व. इ यातून हुगळी, कबडक, जबुना ह्या नद्या वाहतात.

**बारिंगा** (मरा.) आफ्रि. खं. दक्षिण अगास.

**बारीया** (सं.श.) हि मु. इ. गुजराथ प्रा. [प्रदेश.

**बारीदोआब** (प्रा.) हि प. इ. रावी आणि ब्यास ह्या नद्यांमधील

**बारू** (सामु) अमे. खं. कानडाचे राज्याजवळ बाफीनचा उपसागर व आर्टिक महासागर ह्यामध्ये.

**बार्का** (प्रां.श.) आफ्रि. ख. बार्बरी सं. पैकीं त्रिपोली सं.

**बार्डबरी** (गा) यु. खं. नार्वेम. येथें ता. २१ मे पा. ता. २१ जुलैपर्यंत २ महिन्याचा एक दिवस असतो.

**बार्नेहोम** (बे) यू. ख. दक्षिणेस भूमध्यसमुद्रात.

**बार्बर** (दे) आफ्रि. ख. अरबस्तान देशाचे नांव.

**बार्बरी** (दे) आफ्रि. ख. संस्थान.

**बार्शी** (श.) हिं. मुं. इ. सोलापूर जि. तालुका. रेलवे स्टे. येथे कापसाचा व्यापार मोठा चालतो.

**बार्शिलोना** (श.ब.) यू. खं. स्पेनदेशांत

**बान्या** (सं.) हि. मु. इ. गुजराथ प्रां. रेवाकाठा एजन्सींत.

**बाल्कन** (पर्व.) यू. खं. तुर्कस्तानामध्यें.

**बाल्कश** (सरो.) आशि. खं. स्वतंत्र तार्तरींत.

**बाल्टन** (श.) यू. खं. इंग्लंदांत लांकेशायरमध्यें क्रोल नदीवर.

**बाल्तिक** (समु.) यू. खं. स्वीदन, जर्मनी व राशिया यांजमध्यें.

**बाल्फ्रूर** (श.बं.) आशि. खं. इराणांत.

**बाल्बेक** (श.) आशि. खं. तुर्क. लेबनन पर्वताजवळ.

**बाल्तीमोर** (श.) अमे. खं. उत्तर अमे. युनैतेद् स्तेत्समध्यें. मेरालांदामध्यें.

**बाल्हीक** (दे.) आशि. खं. सिरिया, शाम, हलब हे प्रांत मिळून [झालेला देश.

**बालंग** (गां.) हि. खं. इ. बोनाई याचे गांव.

**बालाघाट** (प्रां.) हिं. मध्यप्रां. जि. यांत गेरु व सुरमा सांपडतो. २. सोलापुर जि. बार्शी ता. उत्तरेस. या नांवाचा डोंगर.

**बालातोनसी** (सरो.) यू. खं. आस्ट्रिया व हंगरी यांमध्यें.

**बालारम** (श.) हि. म. इ. निजामाचे रा. येथे निजामाची फौज [असते.

**बालशिनोर** (सं.) हि. मुं. इ. गुजराथ प्रां. मुसलमानी सं. रेवा[काठा एजन्सींत.

**बालासूर** (श.ब.) हिं. बं. इ. ओडीसा प्रां.

**बालाहिसार** (कि.) आशि. खं. काबूल दे. काबूलच्या किल्ल्याचें नांव.

**बालिआरिक** (बे.) यू. खं. स्पेनच्या द. भूमध्य स. माजोर्का, मिनोर्का, इविसा, फोरमेनतारा इ. बेटांस म्हणतात.

**बालेवार** (श.बं.) अमे. खं. द. अमे. वेनेजुएला देशांत.

**बालोत्रा** (गां.) हि. राजपु. जोधपूर सं. लुनीचे कांठीं.

**बालोद** (गां.) हिं. मध्यप्रां. रायपूर जि.

**बांव** (गां.न.) हि. मुं. इ. सावंतवाडी सं. कुडाळ पे.

**बावंजें** (गां.) हिं. मुं. इ. ठाणें जि. पनवेल ता.

**बावडा**(गा.सं.शा.कि.) हि. मुं. इ. रत्नागिरी जि. देवगड ता. २ कोल्हापूर संस्थानांत पोट सं. यांत गोपीचंदन, पिवडी, हुरमुजी हीं सांपडतात.

**बावडें** (गां.सं.) हि. मुं. इ. गुजराथ प्रां. रेवाकाठा एज. २ पुणें जि. इंदापूर ता. [सांवर.

**बावधन** (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. सातान्यापा. १ को-

**बास** (सामु.) आशि. ख. द. पासि. महासाग. आस्ट्रेलेशिया व तासमानिया ह्यांचमध्यें

**बासन्या** (प्रां.) यू. खं. आस्ट्रियांत हंगेरीमध्यें. [रितां प्रसिद्ध.

**बासल(बाल)**(श.) यू. खं. स्वित्झर्लंडांत. हें रेशमाचे कारखान्याक-

**बासीं** (श.) हिं. ब्रम्हदे. इरावतीचे मुखाजवळ.

**बासीन** (न.) हि. ब्रम्ह दे. इरावतीचा दुसरा फाटा बंगालच्या उपसागरास मिळतो त्याचे नांव.

**बास्तन** (श.) अमे. ख. उत्तर अमे. युनैटेडस्टेट्समध्ये. मासाच्युसेत प्रां. व्यापाराचे ठिकाण.

**बास्पोरस** (सामु.) यू. खं. मारमोरा व काळा समुद्र ह्यांमध्यें.

**बाहामा** (बे.) अमे. खं. उत्तर अमे. जवळ पुष्कळ बेटें आहेत. त्यांत ५०० बेटे ह्या नांवाचीं आहेत. [मध्यें.

**बाहिआ (सानसाल्वादोर)** (बं.श.) अमे. खं. द. अमे. ब्राझील-

**बाहेरी (बारेली)** (श.) हि. वाय. प्रां. रोहिलखं. राजधानी. येथें लाकडी व धातूचे काम चांगलें होतें.

**बिएला** (न.) यू. खं. रशियांत वोलगा नदीस मिळते.

**बिकानीर (नेर)** (श. सं.) हिं. राजपु. सं. भावलपुरच्या पूर्वेस. येथें

काशाच्या सुरया व त्यावर पितळेची नकशी करितात. [मैल.

**बिगनबारी** (गां.) हिं. बं. इ. मीमनसिंग प्रां. जुमालपुराहून १९

**बिचन** (न.) हिं. वऱ्हाड प्रां. सातपुड्यांतून निघून पूर्णा नदीस मिळते.

**बिचींहेद** (भू.) यू. खं. इंग्लंदांत द. किनाऱ्यावर.

**बिजनोर** (श.) हिं. बं. इ. जि.

**बिजरा गोगड** (गां.) हिं. मध्यप्रां. जबलपूर जि.

**बिडी** (श.) हिं. मुं. इ. बेळगांव जि. तालुका. [मिळते.

**बिदर्भा** (न.) हिं. वऱ्हाडांत अजिंठ्यांतून निघून पेणगंगेस

**बियाल्का** (न.) यू. खं. रशियांत वोलगा नदीस मिळते.

**बियाना** (गां.) हिं. वाय. प्रां. आग्र्याप. ५० मैल.

**बियास (व्यास)** (न.) हिं. पं. इ. पंजाबमध्यें हिमालयांतून निघून सतलजला मिळते. लां. २९० मैल.

**बिरभूम** (श.) हिं. बं. इ. जि. [कांठीं.

**बिरवाडी** (गां. कि.) हिं. मुं. इ. कुलाबा जि. महाड ता. काळनदीचे

**बिरसिंगपूर** (गां.) हिं. वाय. प्रां. बुंदेलखंडांत.

**बिरसिलपूर** (गां.) हिं. राजपु. जसलमिराहून ९० मैल.

**बिरुत** (श. बं.) आशि. खं. सिरिया प्रां.

**बिलासपूर** (श.) हिं. मध्यप्रां. जि. रेवा सं. दक्षिणेस.

**बिल्हरी** (गां.) हिं. मध्यप्रां. जबलपूर जि.

**बिशनमती** (न.) हिं. नेपाळ सं. इचे कांठीं खाटमांडू.

**बिसवापूल** (गां.) हिं. वऱ्हाडांत स्टेशन. [राजधानी.

**बिसाओ** (श.) आफ्रि. खं. सेनिगांबियांत पोर्तुगीज सं. ची

**बिसौली** (गां.) हिं. पं. इ. रावीचे कांठीं.

**बिस्क** (उपसा.) यु. खं. फ्रान्स देशाचे पश्चिमेस.

**बेळाशी** (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. शिराळे पेठ्यांत.

**बीड** (श.) हिं. म. इ. निजामचे रा. येथें पागोटीं चांगलीं होतात. २ कोल्हापूर सं.

**बीर** (श.) आशि. खं. तुर्कस्थानांत युफ्रातिस नदीचे कांठीं.

**बीरपूर** (गां.) हिं. वं. इ. फत्तेगडाहून १७ मैल.

**बीरभूम** (प्रां.) हिं. बं. इ. भागलपूर प्रां. दक्षिणेस. यांतून भागीरथी नदी वाहते. यांत अशुद्ध लोखंड व कोळसे पुष्कळ सांपडतात. [राज.

**बुएनोसएरीस**(श.) अमे. खं. द. अमे. आरजेन्टैन (लाप्लाता) ची

**बुकारिया** (प्रां.) आशि. खं. चिनई तार्तरींत मोंगोलियाजवळ [प्रांत.

**बुकास** (सरो.) आशि. खं. तिबेटांत.

**बुकेफाला** (श.) हिं. पं. इ. झेलम नदीचे कांठीं.

**बुखारा** (श.) आशि. खं. पश्चिम तार्तरीची रा. कोहिक नदीचे कांठीं महंमदी धर्मविषयीं प्रसिद्ध.

**बुखारेस्त** (श.) यु. खं. रोमानियाची राज.

**बुचांग** (श.) आशि. खं. चिनांत यांगसी नदीचे कांठीं.

**बुटींगंगा** (न.) हिं. बं. इ. डाका शहरावरून गेली आहे.

**बुढा** (श.) हिं. मध्यप्रां. बालाघाट जि. वाईनगंगेवर ता.

**बुतवाल** (गां.) हिं. वाय. प्रां. अयोध्या पर. नेपाळ व ई. ल.

**बुथिया** (अखा.) अमे. खं. ब्रिटिश अमे. उत्तरेस. [१८१४.

**बुधगया** (देवालय) हिं. बं. इ. गयाक्षेत्रापा. ६ कोसांवर अरण्यांत.

**बुधपाचे गांव** (गां.) हिं. मुं. इ. सातारा जि. खटाव ता.

बुधली (गां.) हिं. मुं. इ. काठेवाड प्रां. राजकोटचा. ११ [मैल.
बुधावळ (गां.) हिं. मुं. इ. खानदेश जि. तळोदे ता.
बुनास (न.) हिं. मुं. इ. कच्छचे अखातास मिळते.
बुरंबाड (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. संगमेश्वर ता.
बुराइ (न.) हिं. मुं. इ. खानदेश जि. पिंपळनेर ता.
बुरेंदा (घा.) हिं. हिमालयांत घाट.
बुरोंडी (गां.) हिं. मुं. इ. रत्नागिरी जि. दापोली ता.
बुर्गा (श.) यु. खं. स्पेन देशांत.
बुर्वो (बं.) आफ्रि. खं. पूर्व आफ्रिकेजवळ फ्रेंच लोकांचें.
बुलढाणा (श.) हिं. वऱ्हाडांत जि. व तालुका. याचे जवळ लो- [णारचें सरोवर.
बुलर (सरो.) हिं. काश्मीरांत.
बुलस्तन (श.) अमे. स. कानडाचे राज्यांत.
बुलोन (श. बं.) यु. खं. फ्रान्सांत.
बुलंदर शहर (श.) हिं. व. इ. जि.
बुशायर (श.बं.) आशि. खं. इराण दे. इराणी अखाताचे कांठीं इं- ग्लिशांच्या ताब्यांत. २ हिं. पं. इ. जमु. सं. जवळ पाहडी सं.
बुसा (श.) आफ्रि. खं. मध्य आफ्रिकेंत नैगर नदीचे कांठीं.
बुहिलो (श.) अमे. खं. मध्य अमे.
बूग (न.) यु. खं. रशियांत नीपर नदीस मिळते.
बेगंपूर (गां.) हिं. मुं. इ. सोलापूर जि. ता. भीमेच्या कांठीं.
बेजवाडा (गां.) हिं. मुं. इ. कृष्णानदीचे कांठीं. येथें शेतकी- साठीं मोठमोठे कालवे आहेत.

**बेटावद** (श.) हिं. मुं. इ. खानदेश जि. शिंदखेड ता. पांझरा नदीचे कांठीं. येथें गेरू व बोरें चांगलीं होतात.

**बेडफर्ड** (श.) यू. खं. इंग्लंदांत नेम्स नदीवर.

**बेडन** (श.सं.) यु. खं. आस्त्रियांत दान्युबनदीचे उगमाजवळ सं. बव्हेरियाचे पश्चिमेस.

**बेदनूर** (श.कि.) हिं. म. इ. म्हैसूर सं. तुंगभद्रेच्या कांठीं टिपू व इंग्लिश यांची लढाई, स. १७८३. मंगळूरपा. ५४ मैल.

**बेदर** (श. न.) हिं. म. इ. निजामचे रा. मांजरा नदीचे कांठीं. हे मुसलमानी रा. होतें. येथें धातूवर सोन्या-रुप्याचें मुलाम्याचें काम चांगलें होतें. २ राजपु. तून बुंदेलखंडांतून जातें.

**बेनकुलेन** (श.) आशि. स. द्. सुमात्रा बेटांत. २ संज्ञा बेटांत मिनाक म. की त.

**बेमनवीस** (पर्व.) यु. खं. स्कॉटलंदांत. [होतात.

**बेनी** (ग्रा.) हि. मध्य प्रां. भंडारा जि. येथे जाजमे तयार

**बेपूर** (बं.श.) हिं. म. इ. मलबार किनाऱ्यावर कालीकोट

**बेरच** (श.) हिं. अयोध्या प्रां. जि. [बंदराचे खालीं.

**बेरबीस** (न.) अमे. सं. द. अमे. ग्वायनांतून निघून अतलांतिक महासागरास मिळते.

**बेरली** (श.) हिं. वाय. प्रां. येथे तांदुळाचें पीक चांगलें होतें.

**बेरसोव** (श.) आशि.खं. रशियांत.

**बेलग्रेस** (श.) यू. खं. सर्वियामध्यें.

**बेलजम** (दे.) यू. खं. फ्रान्स देशाचे उत्तरेस.

